# गीता-सुभाषितम

*Or*

# Wise Words from the Geeta.

[ *By:* M. N. Patil ]

Has been *sanctioned* by Bombay, C. P. & Berar and Baroda Edl. Depts., *Patronised* by many Indian States, such as Gwalior, Baroda, Bhavnagar, Dharampur, Kolhapur, Savantwadi, Aundh, Vishalgad, Ramdurg etc., *supported* and *encouraged* by a number of Local Authorities, and *introduced* as a *moral*, *Religious*, *Sanskrit supplementary* or *Rapid Reader* by many High Schools and A. V. Schools in this Presidency and out side.

## Revised and Enlarged.

*Gujarati—English* Edition of the above ( by Metha & Patil ) has been sanctioned by the Baroda State Edl. Dept. and by

**The Hon'ble Agent to The Governor General**
( Western India States Agency. )

(1) as a *prize book* for secondary Schools & Training Colleges,
(2) for use as *a book of Moral Instruction* in higher standards of High Schools, and
(3) as a *Library book* for all Schools

under the supervision of the Edl. Officer, W. I. S. Agency by his order J.-432-32 of 1933, dated, Rajkot, 8th March 1933.

Price:—*Guj.-Eng.* Edn. As. 12; Marathi-Eng. revised & Enlarged 2nd edn. just ready for sale, as. 12 only.

M. N. PATIL,
Patankar's Bldgs. L. J. Rd.,
*Dadar-Bombay No. 14.*

ॐ नमो भगवते वासुदेवाय ।

पुराणेष्वितिहासेषु तथा रामायणादिषु ।
वचनं सारभूतं यत्तत्सुभाषितमुच्यते ॥

# गीता-सुभाषितम्
## OR
# WISE WORDS from THE GITA




लेखक

मोरो नानाजी पाटील ( मोरया शिरगांवकर ),

शिक्षक, ले. ज. रोड म्यु. सेंट्रल स्कूल, दादर-मुंबई.



प्रस्तावना-लेखक

प्रो. हरि दामोदर वेलणकर, एम्. ए., विलसन कॉलेज, मुंबई.





आमूलाग्र सुधारून बरीच वाढविलेली

मराठी-इंग्रजी ] मे १९३५ [ द्वितीयावृत्ति





किंमत १२ आणे ] अक्षय्यतृतीया शके १८५७ [ Price As. 12

# श्रीमातृचरणीं

## अर्पणपत्रिका

श्रीपाटीलकुलोत्पन्नश्रीनारायणसूनुना
मोरेश्वराभिधानेन कृतमानृण्यपत्रकम् ॥ १ ॥

श्रीकृष्णः शरणं ममेति हृदये संभावयन्ती मुदा
त्वं मां गर्भगतं बभर्थ सुधिया संयोजयन्ती सदा ॥
श्रीनारायणपादपद्मनिरते मातर्बये मानिनि
न्यस्ता त्वच्चरणारविन्दयुगले वाग्व्याकृतिः स्यान्मुदे २

# संक्षेप ( Abbreviations )

A. Atmanepada
abl. Ablative
a., adj. Adjective
acc. Accusative
act. Active
adv. Adverb
caus. Causal
comp. Comparative
du. Dual
Dat. Dative
fem. Feminine
Fut. Future
Gen. Genetive.
ind. Indeclinable
inf. Infinitive
instr. Instrumental
mas. Masculine
loc. Locative
P. Parasmaipada
p. p. Past Participal
pass. Passive
per. Person
pl. Plural
pre. Present
pron. Pronoun
sing. Singular
U. Ubhayapada

---

अ. अव्यय, अव्ययीभाव, अनेकवचन
आ. आत्मनेपद
इच्छा. इच्छादर्शकरूप
उ. उभयपद
उप. स. उपपद तत्पुरुष समास
ए. एकवचन
क. कर्मणि
क. धा. स. कर्मधारयसमास
क स कर्मधारयसमास
कर्त. कर्तरि
च. चतुर्थी
त. स. तत्पुरुष समास
तृ. तृतीय पुरुष, तृतीया विभक्ति
द्वं. स द्वंद्व समास
द्वि. स. द्विगु समास
धा., धा. सा. धातुसाधित
न. नपुंसकलिंगी
न. स. नञ समास
प. परस्मैपद
पं. पंचमी
पु. पुल्लिंगी, पुरुष
प्र. प्रयोजक, प्रथम, प्रथमा
ब. बहुवचन
ब. स. बहुव्रीहि समास
भ. भविष्यकाळ
भू. भूतकाळ
व. वर्तमानकाळ
वि. विशेषण
ष. षष्ठि
ष. त. स. षष्ठि तत्पुरुष समास
स. सप्तमी, समास
समा. द्वं समाहार द्वंद्व.
सर्व. सर्वनाम
हेत्व. हेतुदर्शक, हेत्वर्थक

---

प्रो. ह. दा. वेलणकर एम्. ए. विल्सन कॉलेज–मुंबई

# यांची प्रस्तावना

आज हजारों वर्षें आर्यांच्या अत्यंत परिचयाचा व त्यांच्या जीवितक्रमावर यथोचित परिणाम घडवून आणणारा महत्त्वाचा ग्रंथ म्हटला म्हणजे **श्रीमद्भगवद्गीता** हा होय. श्रुतिवाङ्मयांतील तत्त्वोपदेशक भाग जीं उपनिषदें त्यांचें सार, या भगवद्गीतेंत आलें असल्यामुळें या ग्रंथालाहि **उपनिषद्** ही अत्यंत मानाची पदवी कित्येक शतकांपासून देण्यांत आली आहे. वास्तविक पहातां **उपनिषद्** ही पदवी सामान्यतः ऋषिदृष्ट जे वेद त्यांतील अखेरच्या तत्त्वज्ञानोपदेशक भागास दिली जाते व तदनंतर ऋषींनीं स्वतःच्या बुद्धीनें रचिलेल्या ग्रंथांस **स्मृति** असें म्हटलें जातें. **व्यास**–प्रणीत महाभारतांतील भगवद्गीता हा ग्रंथ, खरें पाहिलें असतां स्मृति या सदराखालीं येते व यानां वानें त्याचा **ब्रह्मसूत्रां**मध्यें व इतरत्र अनेकवार उल्लेखहि केलेला आहे. तथापि उपनिषदांचा मथितार्थ अत्यंत सुलभ रीतीनें यांत ग्रथित केला असल्यामुळें या ग्रंथाला **उपनिषदच** म्हणण्याचा प्रघात पडला आहे. व याच कारणास्तव **उपनिषदें व ब्रह्मसूत्रें** यांच्या शेजारींच वेदांत–शास्त्राच्या मूल आधारभूत ग्रंथांमध्यें श्रीमद्भगवद्गीतेस स्थान देण्यांत येत असतें. **उपनिषदें, ब्रह्मसूत्रें व भगवद्गीता** हीं वेदांतशास्त्राची **प्रस्थानत्रयी** समजली जाते. या तीहींचें पूर्ण अध्ययन केल्यावांचून वेदांतशास्त्रांत गति होत नाहीं. खुद्द वेदांतमतामध्येंच ज्यावेळीं अनेक पंथ उत्पन्न झाले, त्या वेळीं देखील प्रत्येक पंथाच्या प्रवर्तक आचार्याला ब्रह्मसूत्रें व उपनिषदें यांचेबरोबरच श्रीमद्भगवद्गीतेवरहि टीका लिहून श्रीमद्भगवद्गीता हा ग्रंथ आपल्या पंथाला उपोद्बलक आहे असें सिद्ध करून दाखविण्याचा प्रयत्न करावा लागला आहे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें हा ग्रंथ इतका महत्त्वाचा आहे.

पण हा ग्रंथ आबालवृद्धांस इतका प्रिय होण्याचें कारण मात्र माझे मतें निराळेंच आहे. निवळ पुण्यप्राप्ति व्हावी या हेतूनेंच या ग्रंथाचें पठण करणाऱ्या धर्मभोळ्या माणसांची गोष्ट बाजूला ठेविली तरी देखील तत्त्वज्ञानाची अपेक्षा

नसलेल्या व्यावहारिक माणसांच्या वाचनांतहि हा ग्रंथ नेहमीं पहाण्यांत येतो. याचें कारण, या ग्रंथांतील उच्च दर्जाची व्यावहारिक नीतिमत्तेची शिकवण हें होय. वास्तविक पहातां, **आमच्या सनातन धर्मांत व्यावहारिक नीतिमत्तेच्या शिकवणीची उभारणी सर्वत्रच तत्त्वज्ञानावर केलेली आहे.** तत्त्वज्ञान एक सांगतें व नीतिमत्तेचे नियम दुसरेंच शिकवितात, असला विपरीतपणा आमच्या धर्मांत कधींच दिसून येत नाहीं. तथापि **व्यावहारिक नीतिमत्ता म्हणजे प्राणीमात्राचें इतर प्राण्यांचे बाबतींतील कर्तव्यकर्म व आत्यंतिक तत्त्वज्ञान यांची सांगड** इतक्या उत्तम व सोपपत्तिक रीतीनें घालून दाखविलेली दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथांत आढळून येत नाहीं. व याच कारणास्तव हा ग्रंथ तत्त्वज्ञानपराङ्मुख तरुणांस, त्याचप्रमाणें नीतिमत्तेच्या ज्ञानाची जरूर नसलेल्या वृद्धांस सारखाच प्रिय वाटतो. खरें म्हटलें तर **कर्तव्यपराङ्मुख झालेल्या पंडितमन्य तरुणांस कर्तव्यनिष्ठ बनविण्याकरितां** या ग्रंथाचा अवतार आहे व म्हणूनच प्रत्येक तरुण माणसानें आपलीं कर्तव्यें समजून घेण्यासाठीं या ग्रंथाचें अवश्य परिशीलन केलें पाहिजे.

अलीकडे शाळांतून मध्यम–प्रौढ विद्यार्थ्यांना कांहीं तरी धर्मग्रंथ शिकविण्यांत येत असतो व ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. आपलें राष्ट्र, आपलें कुटुंब, आपला परमेश्वर व अखिल मानवजाति यांच्या संबंधाच्या आपल्या कर्तव्याच्या कल्पनांचें बीजारोपण तरुण मनाच्या भूमिकेंत झालें तरच त्यापासून कांहीं फलनिष्पत्ति होण्याचा संभव असतो. मला वाटतें, अशा तऱ्हेच्या मुलांस शिकवण्याजोग्या धर्मग्रंथांत श्रीमद्भगवद्गीतेस अग्रस्थान देणें जरूर आहे. अडचण एवढीच कीं, हा येवढा मोठा ७०० श्लोकांचा ग्रंथ एवढ्या थोड्या वेळांत इतर अभ्यास सांभाळून करून घेतां येणें शक्य नसतें. शिवाय, समग्र ग्रंथाच्या अध्ययनाची तरुण विद्यार्थ्यांस फारशी जरूरहि नसते. त्यांतील एकाददुसरा अध्याय करून घेणें हेंहि तितकेंसें समाधानकारक नाहीं.

रा. रा. **पाटील** यांनीं काढलेली **गीतासुभाषिताची** युक्ति मात्र मला वाटतें, फार समर्पक आहे. गीतेंतील, तरुण विद्यार्थ्यांस विशेष जरूर व महत्त्वाचा असलेला भाग बाजूला काढून तेवढाच त्यांचेकडून चांगला तयार करून घेणें हें केव्हांहि अत्यंत सयुक्तिक आहे. सर्व गीता भराभर तोंडपाठ म्हणतां

येण्यापेक्षां त्यांतील निवडक सुभाषितात्मक भाग, अन्वयार्थ व भावार्थ यांसह समजून सांगतां येणें हें अधिक महत्वाचें आहे यांत शंका नाहीं. रा. रा. **पाटील** यांनीं **गीतासुभाषित** हा ग्रंथ तरुण विद्यार्थ्यांच्या दृष्टीनेंच लिहिला आहे. ते स्वतां उत्तम शिक्षक असल्यामुळें विद्यार्थ्यांस आवश्यक असणाऱ्या बहुतेक सर्व गोष्टींचा त्यांनीं आपल्या ग्रंथांत समावेश केला आहे.

प्रत्येक श्लोकाचा अन्वय, कठीण शब्दांचा अर्थ व धातूंबद्दल (इंग्रजी-मराठींत) भरपूर माहिती, विशिष्ट शब्दांची साधार निरुक्ति, सामासिक पदांचा विग्रह, सरळ मराठी व इंग्रजी भाषांतर या गोष्टी तर रा. रा. पाटील यांनीं आपल्या पुस्तकांत दिल्याच आहेत पण यांखेरीज उद्धृत श्लोकाला समानार्थक अशीं संस्कृत व इंग्रजी भाषेंतील **सरस वचनें**देखील त्यांनीं सर्वत्र घातलीं आहेत. त्याचप्रमाणें प्रत्येक अध्यायाच्या आरंभीं त्यांतील मथितार्थहि अगदीं थोडक्यांत सांगून प्रसंगविशेषीं श्लोकाचा अर्थ विशेष स्पष्ट होण्यासाठीं श्लोकाचा मागचा पुढचा संदर्भहि थोडक्यांत दिला आहे. शेवटीं दिलेल्या श्लोक, धातु व शब्द यांच्या शास्त्रोक्त सूचीमुळें तर ग्रंथाच्या उपयुक्ततेंत अधिकच भर पडली आहे. सारांश, अशा तऱ्हेचा ग्रंथ निर्माण करून रा. **पाटील** यांनीं विद्यार्थि-वर्गास कायमचे ऋणी करून ठेविलें आहे.

विद्यार्थ्यांखेरीज **सामान्य वाचकांनादेखील या ग्रंथाच्या परिशीलनानें गीतेंतील हृद्गत समजून घेण्यास फार मदत होईल,** यांत संशय नाहीं. कार्यबाहुल्यामुळें व कधींकधीं आळसामुळें **गीतारहस्य** वगैरे, सारख्या प्रचंड ग्रंथांचें परिशीलन करणें अशक्यप्राय होतें व गीतेंतील रहस्य समजून घेण्याची इच्छा तर असते; अशावेळीं रा. पाटील यांच्या पुस्तकाचा बराच उपयोग होईल अशी माझी कल्पना आहे.

विलसन कॉलेज, मुंबई.<br>ता. २ जुलै १९२७.

**हरि दामोदर वेलणकर.**



# हकीकत.



सर्व शक्तिमान् व दयाघन प्रभूच्या कृपेमुळें "**गीता-सुभाषिता**" नें सुधारलेल्या स्वरूपांत पुनर्मुद्रण पाहिलें, ही अत्यंत

**पदन्यास.**

आनंदाची गोष्ट होय. प्राचीन ग्रंथांपैकी गीतेइतक्या, छोट्या-मोठ्या, किंमतीनें हलक्या-भारी, जगांतील बहुतेक प्रमुख भाषांत भाषांतरित व विविध स्वरूपाच्या आवृत्ती दुसऱ्या कोण-त्याहि ग्रंथानें पाहिल्या नसतील. अशा बहुविधतेंत, मजसारख्या एका **अज्ञ** व अननुभवी लेखकाच्या कंथास्वरूपी **गीता-सुभाषितम्** या पुस्तकाची भर, **म्हणजे** कोण झाडाचा पाला! तथापि शुभेच्छु व वडीलधाऱ्या व्यक्तींनीं आपल्या अज्ञान बालकाच्या बोबडया बोलाचेंहि सप्रेम कौतुक करावें, त्याप्रमाणें लेखक किंवा त्याचें लेखन कसल्याहि योग्यतेला पात्र नसतांना, गुणी विद्वानांनीं व संपादकांनीं पुस्तकाचा सादरसत्कार तर केलाच, परंतु याहि पुढें जाऊन अभि-प्राय देतांना अवास्तव स्तुतीचा वर्षाव केला, हें त्यांचें सौजन्यच होय.

पुस्तक **मुंबई, मध्यप्रांत-वऱ्हाड व बडोदें** येथील शिक्षणखात्यांनीं संमत केलें; **ग्वाल्हेर** दरबारनें १०० रुपये अनपेक्षित

**उत्तेजन**

पाठवून पुस्तकास आश्रय ( Patronage ) व उत्ते-जन दिलें; **बडोदें, कोल्हापूर, औंध, रामदुर्ग, विशाळगड, सावंतवाडी** वगैरे संस्थानांनीं, व **कराची, ठाणें, मुंबई, वर्धा, उमरावती** इ० स्कूलबोर्डांनीं पुस्तकाच्या प्रती शाळा, लायब्ऱ्या व बक्षिसें यासाठीं खरेदी करून सक्रिय साहानुभूति दाखविली; **सो. क्ष. समाजोन्नति संघानें** पंचवीस रुपयांचे ग्रंथ लेखकास पारितोषिक म्हणून देऊन व **ठाणा** डि. बोर्डाचे लोकप्रिय माजी प्रेसिडेंट **श्रीमंत गोविंदराव वर्तक बी. ए.** विरार, यांनीं पुस्तक-प्रकाशनास पंचवीस रुपयांचा पुरस्कार करून गुणग्राहकता प्रकट केली; तसेंच **महाराष्ट्र** व **मध्यप्रांत-वऱ्हाड** येथील बऱ्याच हायस्कूलच्या हेडमास्तरांनीं व संस्कृत शिक्षकांनीं हें पुस्तक, कोठें **धार्मिक व नीति-पाठ** ( Religious and Moral Teaching ) म्हणून, तर कोठें **पुरवणी-संस्कृत वाचन** ( Supplementary or Rapid Reader ) म्हणून अभ्यास-क्रमांत

प्रविष्ट करून पुस्तकाच्या उपयुक्ततेविषयीं आपली हार्दिक मान्यतादि दर्शविली. याबद्दल प्रस्तुत लेखक वरील सर्व विद्वान् अधिकारी व गुणी सज्जन यांचा अत्यंत ऋणी आहे. इतकेंच नव्हे, तर प्रस्तुत पुस्तकाचा हा **पुनरुद्धार** केवळ त्यांनीं लाविलेल्या हातभाराचेंच फळ होय, हें कृतज्ञतेनें कबूल केल्या-वाचून राहवत नाहीं.

प्रथमावृत्ति प्रसिद्ध होऊन एक वर्ष होण्यापूर्वींच तिला गुर्जरी पेहराव देण्याची कल्पना निघून ती मूर्तस्वरूपांतहि आली. ही आवृत्ति-

**वेषांतर—**

देखील **बडोदें, भावनगर** सारख्या गुर्जरभाषाभिज्ञ संस्थानांकडून मान्यता पावली. काठेवाड ( वेस्टर्न इं. स्टे. ए. ) चे **धि आनरेबल एजन्टसाहेब टु धि गव्हर्नर जनरल** यांनींहि या पुस्तकाला सर्व हायस्कूलांच्या वरच्या इयत्तांत **नैतिक शिक्षणा-** ( Moral Instruction ) साठीं, दुय्यम शाळा व ट्रे. कॉलेजें यांत **बक्षिसा-साठीं** व सर्व शिक्षण-संस्थांत **वाचनालया**साठीं म्हणून मान्यता ( Sanction ) दिली. या सर्व गोष्टींमुळें ‘ **गीता-सुभाषितम्** ’ चा सर्वत्र बोलबाला झाला. त्याची **हिन्दी** आवृत्ति काढल्यासहि जरूर खपेल, म्हणून **इंदूरचे** विद्याभिलाषी **सरदार किबे** एम्. ए. एल्एल्., बी. व **दमोह** येथील डि. कौं. चेअरमन श्री. **जे. एल्. वर्मा** बी. ए एल्एल्. बी. यांच्याकडून सूचना आल्या. श्री. **एम्. बी. नायक. बाड** (कारवार) येथील हायस्कूलचे हेडमास्तर यांनीं, पुस्तकाचें **कानडी भाषांतर** कां करीत नाहीं, म्हणून आग्रहाची व प्रेमाची विचारणा केली. पण **“सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः”** या न्यायानें वरील गोष्टी एकदम हातीं घेतां आल्या नाहींत. तथापि ह्या नव्या सुधारलेल्या आवृत्तीचें **हिंदी रूपांतर** शक्य तितकें लौकर हातीं घेणार आहें.

पुस्तकाची कल्पना व रचना नवीन तऱ्हेची आहे, ही गोष्ट १९२७ सालीं पुस्तक प्रथम प्रसिद्ध झालें तेव्हांच पुष्कळांनीं अभिप्राय

**वैशिष्ट्य**

देतांना अनपेक्षित कबूल केली आहे तदनंतर **याच नमुन्यांचीं** लहान मोठीं अनेक पुस्तकें पुढें आलीं; तथापि, कर्मयोगी भगवंताच्या कृपेमुळें ‘ **गीतासुभाषिता’चें** सुभाषित-वैशिष्ट्य आजतागायत कायम असून महाराष्ट्र भाषेचे अभिमानी, संस्कृत भाषेचे पुरस्कर्ते व धार्मिक आणि सांस्कृतिक ( Cultural ) शिक्षणाचे उद्धारक या

सर्वांच्या साहानुभूतीमुळेंच त्याचें वैशिष्ट्य कायम ठेऊन आमूलाग्र सुधारलेली ही नवी आवृत्ति प्रसिद्ध होत आहे.

**हीं गीता व तुम्ही भीता ?**

पुस्तकाच्या नांवांत "**गीता**" शब्द असल्यामुळें कित्येक **विद्वान्** व्यक्ति बिचकतात, तर कित्येकांस **गीता-ग्रंथाचाच** वीट आलेला दिसतो. एका हायस्कूलचे विद्वान् प्रिन्सीपालसाहेब तर म्हणाले देखील, "I am deadly against the Geeta and its teachings; it has no poetical beauty nor inspiration.–गीता व तिची शिकवणूक या बाबतींत म्हणाल, तर माझें मत अगदीं विरुद्ध आहे. तिच्यांत काव्यसौंदर्य नाहीं व बुद्धीला प्रेरणाहि नाहीं." परंतु **गीता** ही **महाभारतां**तर्गत असून या दोहोंतील बरीच वचनें किंवा त्रोटक भाग, संस्कृत अभ्यासाठीं म्हणून लिहिलेल्या सर्व लहान-मोठ्या पुस्तकांत त्या त्या विद्वान् लेखकांनीं समाविष्ट केलेले आहेत; ही गोष्ट या प्रिन्सीपालसाहेबांच्या लक्षांत नसेल. शिवाय गीतेंत काव्य-सौंदर्य नाही व प्रेरणा-चालनाहि नाहीं हें म्हणणें तर अधिकच धाष्टर्याचें आहे! मग **व्यासानें** गीता लिहिली तरी कोणासाठीं व कशासाठीं? वरील सारख्या कांहीं व्यक्तींना '**गीता**' हें नांव 'अस्पृश्य' वाटावें, व त्याच वेळीं, परधर्मीयांनीं परदेशांत बसून, उंटावरून शेळया हाकतात त्याप्रमाणें, "**खास हिन्दी मुलांसाठीं**" सन्मार्गाचे व शिक्षणाचे धडे म्हणून लिहिलेल्या अनेक पुस्तकांची निवड करीत बसावें, हें आश्चर्य होय! या त्यांच्या सर्वथैव परधार्जिणी वृत्तीबद्दल कोणालाहि कींवच येईल! परकीयांचें चांगलें व अनुकरणीय तेवढें कधींहि आत्मसात् केलेंच पाहिजे, परंतु स्वकीयांनीं ठेविलें आहे, त्याजकडे आत्मीय व विवेचक दृष्टीनें पाहूंच नये, हा कोठला न्याय? असो. हा विषय स्वतंत्रपणें लिहिण्याइतका वावदूक व विचाराचा आहे. म्हणून तो येथेंच अपुरा ठेवणें बरें!

**मधुकरी**

पुस्तकाच्या रचनेचा विचार करतांना हें पुस्तक म्हणजे केवळ माझी मधुकरी (भिक्षा) आहे असें प्रथमतःच कबूल केलें पाहिजे. स्वतःमध्यें निर्वाहक्षमता नसल्यानें उदार अन्नदात्यांकडील भिक्षावृत्तीनें गोळा कलेलें अन्न बिचारा **मधुकरी** (भिक्षान्न मागणारा ब्राह्मण) **गोड करून** घेतो व खातो.

इतकेंच नव्हे तर भिन्नरुचींच्या व भिन्नस्थितीच्या दात्यांकडून मिळालेलें अन्नहि भिन्नपाक व भिन्नरस असल्यामुळें एकाच वेळीं तो **मधुकरी**, एकाद्या श्रीमंतालाहि अशक्य इतक्या खाद्य प्रकारांची चव अनुभवितो. तद्वत् ही माझी **मधुकरी** ( ज्ञानभिक्षा ) आहे. स्वतःजवळ विश्वविद्यालयाची विद्वता नाहीं, किंवा पाठशाळेंतील पांडित्य नाहीं. परंतु केवळ असल्या विषयांची आजन्म आवड, हेच एक कारण, **मूळ गीता-सुभाषिताच्या** लेखानास झालें. व तो प्राथमिक प्रयत्न सर्वांस आवडला म्हणूनच गेल्या ७।८ वर्षांत, वाचनानंतर केलेल्या टिपणांचा व शक्त्यनुसार उपलब्ध झालेल्या नव्याजुन्या ग्रंथाचा उपयोग यथामति करून ही द्वितीयावृत्ति आमूलाग्र नवीन लिहिली आहे. हिच्यांत दिसणारें विचारसौष्ठव, सर्वत्र आढळणारीं सुंदर वाग्रत्नें व चेतोहर कल्पनासादृश्य हीं सर्व त्या त्या प्राचीन-अर्वाचीन महाभागांचीं आहेत. यांत माझें असें कांहीं नाहीं. बाजारांतील अनेकविध आवश्यक वस्तू पाकशाळेंत गोळा कराव्या, व पूर्वानुभव नसतांहि पाकसिद्धी करून ती रसज्ञापुढें वाढण्याचा वृथा आव आणावा, तशीच बहुंशीं माझी स्थिति झाली आहे. या-गीताग्रंथरूप-पात्रांतील पदार्थ बेचव असतील, अळणी लागतील किंवा अपरिपक्व वाटतील, पण तो माझा व्यक्तिगत उणेपणा किंवा वैगुण्य आहे. हें वैगुण्य रसज्ञ पंडितांनीं केवळ दोषैक दृष्टि न ठेवितां, **प्रेमळ** व सक्रिय सहानुभूतीनें दाखवून, यापुढील तृतीय मुद्रण निर्दोष करण्यास साह्य करावें, अशी त्यांस नम्र विनंति आहे.

**सुधारणा**

या आवृत्तींत गीताश्लोकांत संस्कृत व्याकरणाचा येणारा भाग, विशेष विस्तृतपणें दिला असून श्लोकांतील महत्त्वाच्या शब्दांवर माहितीपूर्ण टीपा दिल्या आहेत. श्लोकांतर्गत सर्व समास सविग्रह देऊन कठीण शब्दांच्या व्युत्पत्तीसह व्याख्या दिल्या आहेत. कांहीं विवाद्य शब्दांवरील निरनिराळ्या संस्कृत भाष्य-टीकाकारांच्या व्याख्या मूळाप्रमाणें मुद्दाम उध्दृत केल्या आहेत. संस्कृत व इंग्रजी वाङ्मयांतील समानार्थक व तुलनात्मक शेंकडों वाग्रत्नें ( Parallel Quotations ) यथामति जोडली आहेत. त्यामुळें निरनिराळ्या काळीं व स्थळीं तत्तद्देशीय विद्वानांचे विचार कसे जुळते होते व असतात, हें तुलनेनें कळून ज्ञानांत भर पडेल आणि अभ्यासू सहजच विचारप्रवण होईल. ही वचनें गोळा करून शक्य त्या व तितक्या योग्य श्लोकांखालीं देतांना, माझी अल्प बुद्धि व अनभ्यस्तपणा यांमुळें

फारच श्रम करावे लागले. घेतला एकादा श्लोक! काढली पेन्सील! कीं दिलीं त्यावर आपलीं संस्कृत-इंग्रजी वाङ्मयांतील समानार्थक अवतरणें ! असें हें काम नाहीं. इंग्रजी भाषेंत मात्र असे विषयवार कोशग्रंथ व संदर्भग्रंथ त्यांच्या विश्वव्याप्त वाङ्मयावर आधारलेले प्रसिद्ध आहेत. परंतु त्या ग्रंथांचेंहि आजचें परिणत स्वरूप, हें तत्पूर्वीच्या कित्येक लहान-मोठया उद्योगी लेखकांच्या श्रमांचेंच एकीकरण होय. एकाद्या सामान्य बुद्धीच्या मनुष्याला फार झालें, तर, गीतेच्या ५-२५ श्लोकांवर तशी अवतरणें लगेच देतां येतील. परंतु बुद्धि, ज्ञान व पूर्वाभ्यास या त्रयींच्या अभावामुळें वरील "सामान्य बुद्धीच्या" व्यक्तिइतपतहि माझी गति नाहीं. तथापि या कामीं, माझ्या अंगीं बऱ्याच वर्षांची हाडीं-मासीं खिळलेली "**मधुकरवृत्ति**", वाचलेल्या भागांचीं टांचणें, व पुस्तकांवर वेळींच जेथल्या तेथें केलेल्या खुणा-टिपणें यांचा फारच उपयोग झाला. **गुजराथी** आवृत्तिवरील अभिप्रायांत **केसरीनें** सुचविल्याप्रमाणें १७ श्लोक अधिक घातले आहेत; **श्लोकसूचि**बरोबरच, धातुकोश व विशिष्ट शब्दांची सूचि हीं जोडलीं आहेत. शब्दांचे इंग्रजी-मराठी अर्थ देतांना सर्वसामान्य लागू पडणारा व त्या त्या श्लोकापुरता होणारा, असे जरूर तेथें दोन अगर अनेक अर्थ दिले आहेत. प्रत्येक श्लोकावर ५।६ प्रकारचा टाइप घेऊन प्रत्येक भाग वैशिष्टयपूर्ण ध्यानांत यावा असा प्रयत्न केला आहे. श्लोकाशिवाय बाकीचा टाइप थोडा बारिक वापरल्यामुळें एकंदर पुस्तकांत माहिती ३ पट होऊनहि पृष्ठें दुप्पट झालीं आहेत. तथापि सर्वांना घेतां यावें व या नवीन प्रयत्नाचा प्रसार व्हावा, म्हणून किंमत मुद्दाम पूर्वीचीच ठेविली आहे.

**भाषांतर**

गीता-श्लोकांचा अर्थ लावतांना अनेक संस्कृत टीका व इंग्रजी, मराठी, हिंदी व गुजराथी बरींच लहान-मोठीं पुस्तकें पुढें ठेवावीं लागलीं. **पंथभेदामुळें** गीतेचे अर्थ लावण्यांतहि भिन्नता आढळली. तथापि या आवृत्तींतहि पूर्वीप्रमाणेंच **कर्मयोगी** भाषांतर देण्याचा यथामति प्रयत्न केला आहे व तो करतांना इतर टीकाकारांचींहि मतें, अभ्यासकाच्या सोईसाठीं जेथल्या तेथें दिलीं आहेत. असें करतांना इतर मतवादी किंवा पंथवादी यांस दुखविण्याचा किंवा त्यांवर टीका करण्याचा माझा मुळींच हेतु नाहीं व तशी माझी योग्यताहि नाहीं, हें प्रांजलपणें कबूल करितों. इंग्रजी भाषांतर मात्र पूर्वीप्रमाणें

न देतां, मूळ संस्कृत श्लोकावरील माझ्या मराठी भाषांतरास शक्य तोंवर जुळतें व संस्कृतचे विद्यार्थी आणि सामान्य अभ्यासू यांस समजेल अशा सोप्या भाषेंत खुलासेवार देण्याचा अथाग्र प्रयत्न केला आहे. कांहीं इंग्रजी भाषांतरें अगदींच सूत्रमय व तारेच्या बातमीप्रमाणें संक्षिप्त, तर कांहीं पाल्हाळीक व दूरान्वयाचीं अशीं असल्यानें एकवेळ मूळ श्लोकांचा अर्थ कळेल, पण भाषांतर तितकें लौकर खात्रीनें समजणार नाहीं. असा प्रकार या पुस्तकांत शक्य तितका टाळला आहे.

टीपा, माहिती, भाषांतर व समानार्थक वेचें हीं मराठीबरोबर इंग्रजींतून

**उपयुक्तता**

दिल्यानें मराठीप्रमाणेंच इंग्रजींतूनहि संस्कृत शिकणाऱ्या महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांची व त्यांजबरोबर अभ्यास करणाऱ्या इतर प्रांतीय विद्यार्थ्यांचीहि सोय झाली आहे. “ गीतेच्या अभ्यासाबरोबरच संस्कृतच्या व्याकरणभागाचीहि अनायासें उजळणी ( Revision ) होते, ” असें आपलें मत १९२९ सालीं मुंबईंतील एका सुप्रसिद्ध हायस्कुलांतील एम्. ए., बी. टी. शिक्षकानें दिलें. या आवृत्तींतील **संस्कृत** व **इंग्रजी** समानार्थक अवतरणें विचारांत घेतलीं, तर त्यांचें एक स्वतंत्र व सुंदर **सिलेक्शनच** होईल व त्यामुळें ‘ **गीता-सुभाषितम्** ’ हें नांवहि पूर्वीपेक्षां विशेष व्यापक होऊन त्यांतील **गीताबोधा**बरोबरच सुप्रसिद्ध संस्कृत-इंग्रजी ग्रंथांतील विचारांची प्रणालीहि विविधतेनें अनुभवण्यास मिळेल. **ज्ञानेश्वरी, गीतारहस्य** किंवा **राधाकृष्णन्** व कै. **तेलंग** यांचे गीतेवरील सुप्रसिद्ध इंग्रजी ग्रंथ अभ्यासण्यापूर्वी, **गीतासुभाषिता**सारखा छोटा व प्राथमिक प्रयत्न प्रौढ विद्यार्थ्यांस व सामान्य वाचकांस उपयुक्त होईल अशी अपेक्षा आहे. शिवाय विद्यार्थ्यांच्या बाबतींत, ‘ **यत्पठति तद्भावयति, यद् भावयति तद् इच्छति, यद् इच्छति तत्करोति** ’ आणि ‘ **यद् करोति तद् भवति** ’ या न्यायानेंहि झाला तर कांहीं उपयोगच होईल अशी उमेद आहे.

सामान्य व चिकित्सक वाचकांस अभ्यासविभाग सांगण्याची जरूरच नाहीं.

**अभ्यास-विभाग**

परंतु हें पुस्तक या पूर्वींच कांहीं शिक्षकांनीं पुरवणी-किंवा नीतिपाठ-वाचन ( Supplementary or Religious & moral Reader) म्हणून कांहीं ठिकाणीं मुलांच्या हातीं दिल्याचें दिसतें. म्हणून या आवृत्तींत त्याबद्दल सामान्य विभागणी

सुचवीत आहे. (१) इंग्रजी चौथींत, फक्त यांतील गीता-श्लोक प्रथम वर्गात क्रमानें समजून देऊन मग पाठ करून घ्यावे. तसें करण्यापूर्वी घरून त्या त्या श्लोकाची पुस्तकांत दिलेल्या माहितीवरून तयारी करून येण्यास सांगावें, म्हणजे वर्गांत शिकविण्याचें काम कांहींसें सुलभ होईल. एका वर्षात सुमारें निदान १००-१५० श्लोक व्याकरण-शुद्ध समजून झाले तरी संस्कृत अभ्यासास अनायासें उजळणी व पठन यांयोगें मदत होईल. श्लोकाखालीं दिलेला इंग्रजी-संस्कृत अवतरणांचा भाग या वर्गांतील मुलें स्वतः इच्छेनेंच काय करतील तर करूं द्यावें ! ( २ ) पांचव्या इयत्तेंत पुस्तकांतील मूळ सर्व श्लोक व त्या खालील सोपीं व निवडक इंग्रजी-संस्कृत अवतरणें शिक्षकांनीं पसंत करून वर्गांत समजून द्यावीं व पठनानें स्मरणशक्तीचा उपयोग करण्यास उत्तेजन द्यावें. ( ३ ) सहावीमधील विद्यार्थ्यांस या पुस्तकाचा इंग्रजी, मराठी व संस्कृत भाग विशेष उपयुक्त होईल, अशी समजूत आहे. राहिलेले कठीण संस्कृत श्लोक व इंग्रजी उतारे शिक्षकांच्या साह्यानें व त्यांवरील मूळ गीता-श्लोकाच्या संदर्भानें अभ्यसण्याचा प्रयत्न विद्यार्थ्यांनीं करावा; महत्वाचा भाग मुखोद्गत केल्यास उत्तमच ! त्यायोगें वाणीला सौष्ठव येईल, विविध विचारांचा संग्रह होईल आणि शब्दचिकित्सा व अर्थचिकित्सा करण्याची वृत्ति सहज वाढेल. निबंध, लेखन, वाचन, भाषण यांत निवडक वेच्यांचा उपयोग करण्याची प्रवृत्ति होईल. श्लोकाखालीं दिलेल्या कांहीं संस्कृत शब्दांच्या व्याख्या व सविग्रह समासांची फोड, यामुळें शास्त्रीय संस्कृत पाठशाळेंतील अभ्यासक्रमाची व पद्धतीची थोडीशी कल्पना विद्यार्थ्यांस दिल्याप्रमाणें होईल. (४) मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांनीं मात्र हें सबंध पुस्तक, थोड्या चिकित्सक दृष्टीनें एक वेळ अवश्य वाचून ठेवावें. त्यायोगें त्यांच्या पूर्वाभ्यासाची कांहीं अंशी आवृत्तिच होणार आहे.

या पुस्तकाचा अभ्यास वर्गांत चालू असतांना इं. ६-७ यांसारख्या वरच्या वर्गांत त्याला वादविवादाचें ( Debating ) स्वरूप येण्याचा संभव आहे. व त्यामुळें या विषयाला रंग येऊन उलट तो वादविवाद-पद्धतीनें अधिकच मनोरंजक, बोदप्रद व उत्तेजक होईल. तरी या नव्या आवृत्तीचा प्रयोग विद्यार्थी, शिक्षक व पालक यांनीं एकवेळ अवश्य करून पाहावा व पुस्तकाच्या रचनेंत कांहीं दोष व सुधारणा दाखविणें असल्यास त्या **प्रेमळ अंतःकरणानें** मला कळवाव्या. पुढें संधि दिल्यास त्यांचा अवश्य उपयोग करीन.

**गीता**-विषय अगोदरच **गहन**, व त्यांत माझी **मति** तर विशेष **मंद**! यामुळें हातून अनिच्छितपणें घडणाऱ्या **प्रमादाला पारावारच** नाहीं, याची कल्पना मला पूर्ण आहे.

**क्षमा**

पुस्तक छापण्यास सुरवात झाल्यावर पूर्वी खुणा करून राहिलेलीं किंवा चालू वाचनांत आढळलेलीं कांहीं अवतरणें पूर्वीच्या कांहीं पृष्ठांत घालतां आलीं नाहींत. तथापि त्यांपैकीं महत्वाचीं, सामान्य अर्थ पडताळून पाहून नंतरच्या कांहीं श्लोकांखालीं घातलीं आहेत. त्यामुळें कांहीं अवतरणें किंचित् मागे-पुढें झाल्यासारखीं वाटण्याचा संभव आहे. प्रुफें तपासण्याचें काम शक्य तितकें काळजीनें व संदर्भग्रंथ पुनः पुनः पाहून असें केलें आहे; तरीपण अवतरणांच्या स्थळांविषयीं व इतर, अशा कांहीं चूका राहण्याचा संभव आहे. तसेंच कांहीं स्थळीं काना-वेलांटी-रेफार-विरामचिन्हें वगैरे भाग फार्म छापतांना उडण्याचा अगर मोडण्याचा संभव असतो. म्हणून अपरिहार्य पण संदर्भानें समजणारीं अशी क्वचित् अशुद्धें आढळतील. करितां या सर्व अनिच्छित प्रमादाबद्दल सूज्ञ वाचक **क्षमा** करतील अशी आशा आहे.

आतां शेवटचें कार्य आभाराचे! मजवर कृपा करून योग्य मार्ग दाखविणारांची यादी येथें देणें स्थलाभावीं अशक्यच आहे.

**आभार**

१९२७ पासून आजपर्यंत या एका पुस्तकामुळें शेंकडों सन्मान्य, विद्वान् व अधिकारी व्यक्तींचा कमी-अधिक संबंध आला, परिचय झाला व त्यांची निरपेक्ष कृपाहि मला मार्गदर्शक झाली. अंगीं कोणतीहि योग्यता नसतांना या सर्वांनीं जें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष साह्य केलें, त्याबद्दल त्या सर्वांचा मी येथें जरी उल्लेख केला नसला तरीं व्यक्तिशः अत्यंत ऋणी आहें व त्यांनीं अशीच अखंड कृपा ठेवावी.

तसेंच प्रस्तावना लेखक **प्रो. वेलणकर**; श्री. **बी. एन्. वैद्य**-बी.ए..बी.टी. व **एस. व्ही. नावर** बी.ए. बी.टी. किंगजॉर्ज हाय.; **प्रिं. काळे** बी.ए. एलल. बी. एस्. टी. सी. डी, महा. हाय.; श्री. **एम्. पी. खोपकर** बी. ए. दादर मि. स्कू.; **व्हा. प्रिं. गोपाळराव देव,** बी. ए., बी. टी., जी. टी. हाय.: श्री. **व्ही. ई. थिटे,** बी. ए. एस्. टी. सी. संस्कृत टीचर-चंदा. गर्लस् स्कूल; प्रिं. कुमारी इंदिराबाई राऊत एम्. ए., टी. डी. (लंडन), वनिता वि. हाय; श्री. **तळपदे** एम्. ए. हे. मा. राबर्ट-मनीस्कूल: श्री. **राजगुरु,** बी. ए., वि. हाय.;

श्री. **सरदेशपांडे** बी. ए., इंपी. हाय.; श्री. **दामले** बी. ए., बी टी., टयुटो. हाय.; श्री. **देशपांडे** बी ए., हे. मा. मराठा हाय.; सुप. श्री. **सोहनी** बी. ए., राममोहन स्कूल; **प्रो. शिरोडकर** एम्. ए. व **श्री. पेंडुरकर,** **मुंबई** ए. सो. हाय.; श्री. **भा. रा. इनामदार** बी. ए., संस्कृत टीचर सिटि हाय., अ. प्रिं. श्री. **आगाशे** मिशन हाय. भायखळा,; श्री. **बी. ई. सोमणी,** **हे. मा. व आर. एस. कर्वे** बी. ए., बी. एस. सी., एलल्. बी. **भारतविद्या मंदिर;** श्री. **व्ही. एच्. कुळकर्णी** एम्. ए., एस् टी. सी व श्री.**राजे**-स्टु. लि.सो.गर्लस् हाय. व श्री. **भांडारे** बी. ए. यु. हाय., या सर्व शिक्षणशास्त्रज्ञांचा, त्यांनीं वेळोवेळीं केलेल्या सूचनाबद्दल व दाखविलेल्या सहानुभूतीबद्दल मी फार आभारी आहें. प्रो. **महेश्वर अ. करंदीकर** एम्. ए., चिपळूणकर प्राइज-मन व संस्कृत-मराठीचे प्रोफेसर, **लिंगराज कॉलेज**-बेळगांव, यांनीं माझी हस्त-लिखितें प्रेसमध्यें देण्यापूर्वी तपासण्याची तसदी घेतल्याबद्दल त्यांचेहि आभार मानणें अस्थानीं होणार नाहीं. तसेंच **मुंबई वैभव** प्रेसचे व्यवहारदक्ष मॅनेजर श्री. भास्कर महादेव सिद्धये यांनीं, प्रेसला कामाची गर्दी असतांहि माझ्या विनंतीप्रमाणें काम मुदतींत व सुंदर करून दिलें याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. प्रेसमधील कंपोझिटरहि, प्रत्येक पृष्ठांत ५।६प्रकारचा टाइप असतांना व करेक्शन आणि कंपोज टाइपांच्या विविध व विशिष्ट रचनेमुळें अत्यंत किचकट असूनहि या पुस्तकाचें काम त्यांनीं प्रेमानें व उत्साहानें करून कर्तव्य-दाक्षिण्यांतहि परार्थ साधतां येतो हें दाखविलें याबद्दल ते सर्व स्तुतीस पात्र आहेत.

शेवटीं ज्याच्या प्रसादामुळें हें सर्व घडून आलें व शारीरिक आणि मानसिक स्वास्थ्य तितकेंसें नसतांनाहि हें अथांग पुनर्लेखनाचें काम पार पडून नव्या स्वरूपांत द्वितीयावृत्ति प्रसिद्ध झाली. त्या सर्व **जगदाधार जगन्नियंत्याला** वंदन करून हें बरेंच लांबलेलें हृद्गत पुरें करितों.

गी. भ. विनम्र सेवक,

**मोरो नानाजी पाटील.**
( ऊर्फ मोरया शिरगांवकर )

अक्षय्यतृतीया शके १८५७
शिरगांव, ता. पालघर,



# गीता-सुभाषितम्



## अध्याय पहिला



**भारतीय युद्धांत** रणक्षेत्रावर दोन्ही पक्षांकडे असलेले आपले सोयरेधायरे पाहून **अर्जुनास** वाटलें कीं, " ज्यांच्यासाठीं राज्य व सुखोपभोग प्राप्त व्हावे म्हणून आपण युद्ध करण्यास तयार झालों, तेच सगेसोयरे मी माझ्या हातानें मारणार व पापी ठरणार; त्यापेक्षां युद्ध न केलेलेंच बरें." या विचारानें पुढील अघोर परिणामांविषयीं त्यास अत्यंत वाईट वाटलें व खिन्न होऊन त्यानें आपल्या हातचें धनुष्यबाण खालीं टाकिलें. **अर्जुनाला** युद्धारंभीं **विषाद** म्हणजे खेद किंवा दुःख वाटण्याचा हा प्रसंग पहिल्या अध्यायांत आला असल्यानें त्यास **अर्जुनविषादयोग** हें नांव दिलें आहे.

आप्त-बंधुवर्गास मारिल्यानें युद्धांत **जीवहत्या** घडून तिजमुळेंच पुढें कुलक्षय, व कुलक्षयापासून होणारी **अनर्थपरंपरा**, हीं अंतीं अर्जुनाच्या दृष्टीनें कशीं घातुक आहेत, हें त्यानें पुढील श्लोकांत **कृष्णाला** सांगितलें आहे. वास्तविक अर्जुनाची ती केवळ शंकाच होती; व तिचें निरसन करण्यासाठींच **गीताग्रंथ** सांगणें **कृष्णाला** भाग पडलें.

**१. कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥**

**कुलं**—घराणें, कुटुंब, Family. **क्षयः**—नाश, Destruction. **कुलस्य** क्षयः **कुलक्षयः**—(ष. त. स.), तस्मिन् **कुलक्षये**—कुलाचा नाश होण्यांत. In the destruction of a family. प्रकर्षेण नश्यन्ति **प्रणश्यन्ति**—व. तृ. अ. pres. 3rd pl. of प्र+नश्–४ प. नाश पावणें. 4 p. to perish, die. ध्रियते लोकोऽनेन, धरति लोकं वा, इति **धर्मः**—कर्तव्यकर्म, संस्कार, आचार. Duty, rite, traditions. **कुलस्य** धर्माः **कुलधर्माः** (ष. त. स.)—कुलाचार, Traditions of a family, duties incumbent on a tribe.

**धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मेण विधृताः प्रजाः ।**
**यः स्याद्धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चयः ॥**

म. भा. शांति १०९-११.

**धर्म एव हतो हन्ति धर्मो रक्षति रक्षितः ।**
**तस्माद्धर्मो न हन्तव्यो मा नो धर्मो हतोऽवधीत्॥** मनु.८-१५.

**सनातनः**—शाश्वत, नेहमींचा, अनादि, Perpetual, immemorial. **धर्मे नष्टे**—( सति सप्तमी loc. abs. ) धर्म नाश पावला असतां, In the perishing of the traditional duties. **कृत्स्नम्**—वि. सर्व, संपूर्ण, *a.* all, entire. न धर्मः **अधर्मः** (न. स.)—अनीति, lawlessness. **अभिभवति**—व. तृ. ए. pres. 3rd sing. of अभि+भू-१ प. ग्रासणें, वर पगडा बसविणें, 1 p. to overcome, predominate. **उत**—अ. खरेंच, *ind.* certainly. बहुधा वाक्यावर जोर द्यावयाचा असल्यास इति किंवा एकादें क्रियापद यांना जोडून वाक्यांतीं घालितात. Often used for the sake of emphasis especially at the end of a sentence after इति or a verb.

**अन्वयः**—कुलक्षये सनातनाः कुलधर्माः प्रणश्यन्ति । उत धर्मे नष्टे सति अधर्मः कृत्स्नं कुलं अभिभवति ।

**अर्थः**—कुलक्षय झाल्यामुळें परंपरागत चालत आलेले कुलांतील आचार-धर्म नाहींसे होतात, व एकदां हा आचार-धर्म नष्ट झाला म्हणजे, खरोखर, सर्व कुलावर अधर्माचा पगडा बसतो. ४०

In the destruction of a family, its perpetual and traditional duties are quite destroyed. The duties being thus destroyed, lawlessness overcomes the whole family. 40

**सत्येन रक्ष्यते धर्मो विद्या योगेन रक्ष्यते ।**
**मृजया रक्ष्यते रूपं कुलं वृत्तेन रक्ष्यते ॥** म. उद्यो. ३४-३९.

*"Nobody can deny but that religion is a comfort to the distressed, a cordial to the sick, and sometimes a restraint on the wicked."*

*—Lady M. Wortley Montegu.*

*" Accidents will occur in the best regulated families."*

*—C. Dickens.*

*"Every unpunished delinquency has a family of delinquencies."*

*—Herbert Spencer.*

**१. अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥**

**अभिभवः**—ग्रासणें, वरचष्मा. Overcoming, predominance. भवति इति **भवः**, अभिनः भवः **अभिभवः**, अधर्मस्य अभिभवः ( ष. त. स. ). **कृष्णः**—नियमनादिना सकललोककर्षणात् **कृष्णः**—नियमबद्धतेनें सर्व जगाला आपणाकडे ओढून घेणारा **श्रीकृष्ण**; वसुदेव-देवकीच्या पोटीं जन्मास आलेला विष्णूचा ८ वा अवतार. Shri Krishna, Vishnu in his eighth incarnation, born as the son of Vasudeo and Devaki, and who controls and attracts the whole Earth towards Himself.

**यतः कर्षसि देवेश नियम्य सकलं जगत् ।**
**अतो वदन्ति मुनयः कृष्णं त्वां ब्रह्मवादिनः ॥**

प्रकर्षेण दुष्यन्ति **प्रदुष्यन्ति**–व. तृ. अ. pres. 3rd. pl. of प्र+दुष्–४ प. बिघडणें. 4. P. to grow worse, be corrupted. कुलस्य स्त्रियः ( ष. त. स. ) **कुलस्त्रियः**—चांगल्या कुलांतील किंवा घराण्यांतील स्त्रिया. Women of a good family. **स्त्रीषु दुष्टासु**–( सति सप्तमी loc. abs. ) स्त्रिया बिघडल्या असतां. When the women are corrupt. वृष्णेः अपत्यं पुमान् **वार्ष्णेयः**—वृष्णीच्या कुळांत जन्मलेला; श्रीकृष्णाचा एक पूर्वज. Born in the family of Vrishni; an ancestor of Shrikrishna. **जायते**—व. तृ. ए. pres. 3rd. sing. of जन्–( जा )–४ आ. उत्पन्न होणें. 4. A. to be, become, take place. **वर्णः**—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या ४ जाती. A term especially applied to the four principal castes. संक्रियन्ते अस्मिन् इति **संकरः**—मिश्रण. Confusion or mixture. वर्णस्य संकरः ( ष. त. स. )—जातींचें मिश्रण. Confusion of castes.

**व्यभिचारेण वर्णानां । अवेद्यावेदनेन च ॥**
**स्वकर्मणां च त्यागेन । जायन्ते वर्णसंकराः ॥** मनु. १०–२४.

चातुर्वर्ण्यांतील लोकांनीं व जातींनीं परस्पर विवाह लाविल्यास, समानगोत्री व्यक्तींचा विवाह झाल्यास आणि आपापल्या नियत कर्मांचा त्याग केल्यास **वर्णसंकर** होतो.

Either of the following three causes caste confusion: The intermarriages among four castes and their sub-castes marriages between the same family members and leaving of one's own prescribed duties.

**अन्वयः**—कृष्ण, अधर्माभिवात् कुलस्त्रियः प्रदुष्यन्ति । वार्ष्णेय, स्त्रीषु दुष्टासु ( सत्सु ) **वर्णसंकरः** जायते ।

**अर्थ**—कृष्णा, अधर्माचा पगडा एकदां बसला म्हणजे त्या कुळांतील स्त्रिया बिघडतात, आणि स्त्रिया बिघडल्यामुळें, अर्थात्च वर्णव्यवस्था नष्ट होऊन जातिसंकर होतो. ४१

Owing to the predominance of lawlessness, O Krishna, the women of the high family become corrupt; and when the women are corrupt, O Wârshneya, a confusion of castes takes place. 41.

**नाधर्मश्चरितो लोके (राजन्)सद्यः फलति गौरिव ।**
**शनैराव(र्त)र्त्यमानो हि कर्तुर्मूलानि कृन्तति ॥**

—म. आदि ८०-२. व मनु. ४-१७२

" *Where law ends tyranny begins* "—*Earl of Chatham.*

" *Can man be free if woman be a slave ?* —*Shelley.*

**३. संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।**
**पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः ॥ ४२ ॥**

**नरकः**—वाईट स्थिति. नरक २१ प्रकारचे सांगितले असून तेथें पाप्यांना त्यांच्या पातकांप्रमाणें शिक्षा भोगाविण्यांत येते, अशी समजूत आहे. Hell. It is said that there are 21 different parts of the Hell, where different kinds of tortures are inflicted upon sinners. **एव**-अ. खरोखर, अगदीं असेंच. *ind.* just so, quite so. हें अव्यय वाक्यार्थ अधिक दृढ करण्यासाठीं बहुधा उपयोगांत आणितात. This particle is mostly used to strengthen and emphasize the idea expressed by a sentence. कुलं घ्नन्ति ते **कुलघ्नाः**—कुलाची हत्या-नाश करणारे. Family—killers. **पतन्ति**—व. तृ. अ. pre. 3rd. pl. of पत्-१ पडणें; उडणें. 1 P. to fall; to fly. पाति ( रक्षति ) इति **पितृ**—वाडवडील; बाप. Forefathers; a father. **हि**—अ. कारण; *ind.* because. **लुप्त**—(भू.धा. p. p. of लुप्-६ उ. 6 U. ) नाहींसें झालेलें, टाळलेलें. Lost, deprived of. **पिंडः**—श्राद्धसमयीं पितरांना द्यावयाचा भाताचा घास किंवा गोळा. A rice-ball offered to the Manes at the time of Shrâddhâs ( obsequial ceremonies ). पिंडश्च उदकं च पिंडोदके ( द्वं. स. ), पिंडोदकयोः क्रिया ( ष. त. स. ); लुप्ताः

पिंडोदकक्रियाः येषां ते ( ष. ब. स. ) **लुप्तपिण्डोदकक्रियाः**—ज्यांच्या बाबतींत पिंडोदकदान-तर्पणादि क्रियांचा लोप झाला आहे ते. Who are deprived of rice-balls and libations ( the pouring forth of wine or other liquid in honour of the Manes or of a deity. ).

**अन्वयः**—संकरः कुलघ्नानां कुलस्य च नरकाय एव ( कारणं भवति )। हि लुप्तपिण्डोदकक्रियाः ( सन्तः ) एषां पितरः पतन्ति ।

**अर्थः**—वर्णसंकर हा कुलाचा नाश करणारांना व त्या कुलालादेखील नरकांत लोटितो. कारण पिंडदानतर्पणादि क्रियांचा लोप झाल्यानें कुलक्षय करणारांचे पितर अधोगतीला जातात.

The caste-confusion drags ( leads ) the slayers of the family, and the family itself alike to the Hell. For, their ancestors fall, deprived of rice-balls and libations.

**यत्र त्वेते परिध्वंसाज्जायन्ते वर्णदूषकाः ।**
**राष्ट्रिकैः सह तद्राष्ट्रं क्षिप्रमेव विनश्यति ॥** मनु १०-६१.

" *Wine and woman into apostasie*
*Cause wise men to fall.*" —*Lydgate–The remedie of Love.*

" *Hell gives us art to reach the depth of sin,*
*But leaves us wretched fools, when we are in.*" —*Fletcher.*

**४. दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।**
**उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥**

**दोषः**—( दुष् भावे करणे वा दोषः ) अपराध, उणेपणा, भलतेंच काम. Fault, weak point, misdeed. करोति इति **कारकः**—करणारा, Doer, actor. वर्णसंकरस्य कारकः ( ष. त. स. )-**वर्णसंकरकारकः**—जातींचें मिश्रण करण्यास कारणीभूत. Causing caste-confusion. **उत्साद्यन्ते**—प्रयोजक व. तृ. अ. caus. pre. 3rd pl. of उत्+सद्-१ प. नाश करणें, 1 p. to destroy, annihilate. जातेः धर्माः ( ष. त. स. ) **जातिधर्माः**—ब्राह्मणादि चारहि वर्णांचीं कर्तव्यकर्मे, Duties of the four principal castes. कुलस्य धर्माः ( ष. त. स. ) **कुलधर्माः**—कुलानुसारी कर्तव्यें, Duties and customs of a family. **शाश्वत**—वि. चिरकालिक. *a.* Everlasting, permanent.

**अन्वयः**—कुलघ्नानां एतैः वर्णसंकरकारकैः दोषैः शाश्वताः जातिधर्माः कुलधर्माः च उत्साद्यन्ते ।

**अर्थः**—कुलघातकी व्यक्तींच्या असल्या ह्या वर्णसंकरकारक दोषांमुळें पुरातन कालापासून चालत आलेले चिरकालिक वर्णधर्म व कुलधर्म नष्ट होतात. ४३.

By these caste-confusing misdeeds of the destroyers of a family, the ever-lasting duties of the four principal castes and family-customs are rooted out. 43.

**धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा लोके धर्मिष्ठं प्रजा उपसर्पन्ति।**
**धर्मेण पापमपनुदन्ति धर्मे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्धर्मं परमं वदन्ति॥**

तै. आरण्यक १०-६३.

*" Custom, that unwritten law,*
*By which the people keep even kings in awe "—C. D' Avenant.*
*"Custom which is before all law, Nature which is above all art"*
*—S. Daniel.*

५. **उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।**
**नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥**

**उत्सन्न**—( भू. धा. वि. p. p. of उत्+सद् ) नष्ट, Decayed. उत्सन्नाः कुलधर्माः येषां ते ( ष. ब. स. ) **उत्सन्नकुलधर्माः**—ज्यांचे कुलधर्म नष्ट झाले आहेत ते. Those whose family-customs are extinguished or decayed. जनान् अर्दति इति **जनार्दनः**—कृष्ण, Krishna. **नियतम्**—अ. नेहमीं; कायमचा, *ind.* Everlastingly; certainly. **वासः**—राहणें, वसति, Abode. **भवति**—व. तृ. ए. pre. 3rd sing. of भू-१ प. असणें, होणें, 1. to be, become. **इति**—अ. याप्रमाणें, असें, *ind.* Thus. **अनुशुश्रुम**—( द्वि. भूत प्र. अ. perf. 1st pl. of अनु+श्रु-५ प. ऐकणें, 5 p. to hear ) ऐकत आलों आहों. We have heard.

**अन्वयः**—जनार्दन, उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां नरके नियतं वासः भवति इति वयं अनुशुश्रुम ।

**अर्थः**—कृष्णा, ज्यांचे कुलधर्म नष्ट झाले आहेत, अशांना कायमचा नरकवास प्राप्त होतो, असें आम्हीं आजपर्यंत ऐकत आलों आहोंत. ४४

O Janârdana, we have heard ( from the sacred authority ) that the abode of those whose family–customs are rooted out is everlastingly in hell. 44.

**प्रायश्चित्तमकुर्वाणाः पापेषु नियता नराः ।**
**अपश्चात्तापिनः कष्टान्निरयान्यांति दारुणान् ॥** –राघ० टीका.

" *Hell ! a universe of death,*
*Where all life dies, death lives; and nature breeds*
*Perverse, all monstrous, all prodigious things,*
*Abominable, unutterable, and worse*
*Than fables yet have feign'd, or fear conceived.*" —*Milton.*

---

## अध्याय दुसरा

आप्तेष्टांस रणभूमीवर पाहून अर्जुनास विषाद वाटला, आणि युद्धांत जीवहत्या घडल्यानें कुलक्षय व धर्मक्षय करण्यास आपणच कारणीभूत होणार म्हणून संशय येऊन तो उलट कृष्णाला तत्त्वज्ञान सांगूं लागला. हें पाहतांच कृष्णालाहि अर्जुनाच्या शंकेचें निरसन करणें भाग पडलें. " आत्मा अमर आहे. तो मारून मरत नाहीं. " इत्यादि तत्त्वज्ञान या भागांत सांगितलें आहे म्हणून याला **सांख्ययोग** हें नांव पडलें. **सांख्य** म्हणजे **तत्त्वज्ञान**. हातचें धनुष्य टाकणाऱ्या अर्जुनाला हें **सांख्य–शास्त्र** शिकवून क्षात्रधर्माच्या वाटेवर आणण्याचा यशस्वी प्रयत्न या अध्यायापासून कृष्णानें सुरू केला. या व पुढील अध्यायांतील एकंदर उपदेश अर्जुनाला उद्देशून असला, तरी तो कोणाहि व्यक्तीस देशकाल परिस्थितीप्रमाणें कधींहि उपयुक्त असाच आहे. जगाच्या सर्व तत्त्वज्ञानाविषयक व उद्बोधक ग्रंथांत गीतेला प्राधान्य येण्याचें कारण तिच्यांतील हें अप्रतिम तत्त्वज्ञानच होय.

**६. अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पण्डिताः ॥ ११ ॥**

न शोच्याः अशोच्याः ( न. स. )—शोक करण्यास अयोग्य. That which should not be grieved for. **अन्वशोचः**—प्र. भू. द्वि. ए. Imperf. 2nd. sing. of अनु+शुच्–१ प शोक–खेद करणें. 1. P. to bewail, mourn or

grieve for. प्रकर्षेण जानन्ति ते **प्रज्ञाः**—शहाणे, ज्ञाते. The wise men. प्रज्ञानां अवादाः ( वक्तुं अयोग्याः ) **प्रज्ञावादाः** ( ष. त. स. )—शहाण्याला न शोभणारें असें भाषण. A talk or an argument not fit for the wise. **-नीलकंठी टीका. प्रज्ञा**—बुद्धि, शहाणपणा, Intellect, wisdom. प्रज्ञायाः वादाः ( ष. त. स. ) **प्रज्ञावादाः**—शहाणपणाच्या गोष्टी. Wise sayings. **भाषसे**—व. द्वि. ए. pre. 2nd. sing. of भाष्-१ आ. बोलणें, सांगणें. 1 A. to speak, say. **असुः**—प्राण. शरीरांत पांच प्रकारचे प्राणवायु असल्यानें त्या अर्थी **असु** किंवा **प्राण** शब्द नेहमीं अनेकवचनीं योजितात. The breath of life. Usually pl. in this sense, the Pranas or the vital airs in the body being five.

**हृदि प्राणो गुदेऽपानः समानो नाभिसंस्थितः ।**
**उदानः कण्ठदेशस्थो व्यानः सर्वशरीरगः ॥**

गताः असवः येषां ते ( ष. ब. स. ) **गतासवः**—गतप्राण, मेलेले, The dead. न गताः असवः येषां ते ( न. ब. स. ) **अगतासवः**, तान् अगतासून्. **अनुशोचन्ति**—( व. तृ. अ. pre. 3rd. pl. of अनु+शुच् ) शोक करितात. Grieve for. पण्डा ( बुद्धिः ) अस्य अस्ति इति **पण्डितः**—बुद्धिमान्; ज्ञाता. The intelligent or wise man.

**अन्वयः**—त्वं अशोच्यान् अन्वशोचः, प्रज्ञावादान् भाषसे च । पण्डिताः गतासून् अगतासून् च न अनुशोचन्ति ।

**अर्थः**—वस्तुतः ज्यांच्याबद्दल शोक करूं नये, त्यांचा तूं शोक करीत बसला आहेस, आणि मोठ्या शहाणपणाच्या गोष्टी मात्र मला सांगतोस ! जे खरोखर ज्ञाते आहेत ते मृतांविषयीं किंवा जिवंत असणारांविषयीं कधींच दुःख मानीत नाहींत–प्राण गेले काय किंवा राहिले काय, सारखेच ! ११

You have wept for those whom you should not weep for, and yet you speak words of wisdom ! ( Those your very words in the first chapter. sound wise but miss the deeper and practical sense of wisdom ! ) Wise men do not feel sorry either for the dead or for the living.-They never care for the Death. 11.

**सुखं च दुःखं च भवाभवौ च । लाभालाभौ मरणं जीवितं च ।**
**पर्यायशः सर्वमेते स्पृशन्ति । तस्माद्धीरो न च हृष्येन्न शोचेत् ॥**

—विदुरनीति.

"*Reason sets limits to the longest grief.*" —*Drayton.*

"*Vice engenders shame, and folly broods over grief.*" —*Prior-Solomon.*

७. **देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥**

देहः अस्य अस्ति इति **देहिन्**—देहांत राहणारा, **आत्मा**, Dwelling in the body, *the soul.* **यथा**—अ. जसें, ज्याप्रमाणें, *ind.* As, just as. कुमारस्य भावः **कौमारम्**—बालपण, the childhood. यूनः भावः **यौवनम्**—तारुण्य, youthfulness. जीर्यन्ते अंगानि यस्यां अवस्थायां सा **जरा**—म्हातारपण, The old age. **तथा**—अ. तसेंच, *ind.* so, like that, similarly. देहात् अन्यः, अन्यः देहः वा **देहान्तरम्** ( क. धा. स. ), तस्य प्राप्तिः ( ष त. स. ) **देहान्तरप्राप्तिः**—एक देह सोडून दुसऱ्यांत प्रवेश करणें, Passing on from one body to another. धियं राति-यच्छति-ईरयति वा ( उ. त. स. ) इति **धीरः**—धीट, शहाणा, निश्चयी, The brave; the wise; strong or firm-minded. **मुह्यति**—व. तृ. ए. pre. 3rd. sing. of मुह्-४ प. वेडें-मोहित होणें. 4. P. to faint, swoon, or be infatuated.

**अन्वयः**—यथा देहिनः अस्मिन् देहे कौमारं, यौवनं, जरा तथा च देहान्तर-प्राप्तिः अपि अस्ति । तत्र धीरः न मुह्यति ।

**अर्थः**—ज्याप्रमाणें देह धारण करणाऱ्या या **जीवात्म्याला** बाल्य, तारुण्य व वार्धक्य या अवस्था प्राप्त होतात, तद्वतच त्याला एका देहानंतर **दुसऱ्या देहांत प्रवेश** मिळतो. ज्ञानी मनुष्य त्याबद्दल शोकमोहांत पडत नाहीं. १३

As *the soul,* the dweller in this body, experiences the childhood, youth and old age, so passes he on to another body. The wise is not deluded by that. 13.

**यदाणुमात्रिको भूत्वा बीजं स्थास्नु चरिष्णु च ।**
**समाविशति संसृष्टस्तदा मूर्तिं विमुञ्चति ॥** मनु. १–५६
**यामीस्ता यातना प्राप्य स जीवो वीतकल्मषः ।**
**तान्येव पञ्च भूतानि पुनरप्येति भागशः ॥** मनु. १२–२२

"*Like leaves on trees the race of man is found,*
*Now green in youth, now withering on ground.*" —*Pope.*

वरील श्लोकांत **मृत्यु** म्हणजे खरोखर कोणती अवस्था आहे, याबद्दल यथार्थ वर्णन केलें आहे. दुसऱ्यास मारिलें किंवा आपण मेलों तरी **आत्म्यास मरण नसतें**, तो अमर आहे. पण देहाला मरण चुकवितां येत नाहीं.

In the above verses, it has been clearly described the real state of conditions meant by the Death. Though we kill others or die ourselves, the *soul has no death*; it is immortal. But the body cannot avoid the death.

**८. मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥**

मीयन्ते आभिर्विषया इति **मात्राः**—बाह्य पदार्थ; पंचभूतात्मक जग, इंद्रियें. Material world; matter; senses स्पर्शयन्ते इति **स्पर्शाः**—संबंध, संयोग, contact. मात्राणां स्पर्शाः ( ष. त. स. ) **मात्रास्पर्शाः**—बाह्य पदार्थांचे ( इंद्रियांशीं ) होणारे संयोग. Contacts of the material world ( with the senses ). कुन्त्याः अपत्यं पुमान् **कौन्तेयः**—कुंतीपुत्र अर्जुन. Arjuna, a son of Kunti. शीतं च उष्णं च सुखं च दुःखं च तेषां समाहारः **शीतोष्णसुखदुःखम्** ( समाहार-द्वन्द्वः ). शीतोष्णसुखदुःखं ददति इति **शीतोष्णसुखदुःखदाः** ( उप. त. स. ) शीतोष्ण व सुखदुःख यांना कारणीभूत होणारे, causing cold and heat, pleasure and pain. **आगमः**—येणारा, उत्पन्न होणारा, coming. **अपायः**—जाणारा, नाश पावणारा. Going, perishing. आगमश्च अपायश्च आगमापायौ (द्वं. स. ), तौ आगमापायौ येषां ते **आगमापायिनः** ( ष. ब. स. )-उत्पन्न होणारे व नाश पावणारे, क्षणभंगुर. Coming and going, of short duration, transient. **अनित्याः**—कायम न टिकणारे, Not eternal or everlasting. **तितिक्षस्व**—आज्ञा. द्वि. ए. इच्छादर्शक रूप. Imp. 2nd. sing. des. तिज्-१ आ. सोसणें, 1. A. to bear, endure. भरतस्य अपत्यं पुमान्, भरतकुलोत्पन्नः वा इति **भारतः**—अर्जुन. Arjuna.

**अन्वयः**—कौन्तेय, मात्रास्पर्शाः तु शीतोष्णसुखदुःखदाः, आगमापायिनः ( अत एव ) अनित्याः सन्ति । भारत, तान् तितिक्षस्व ।

**अर्थः**—परंतु, अरे अर्जुना, शीत आणि उष्ण किंवा सुख आणि दुःख देणारे बाह्य पदार्थांचे इंद्रियांशीं होणारे हे संबंध ( स्पर्श ) जसे **उत्पन्न होणारे तसेच ते नाश पावणारेहि** आहेत. अर्थात्, ते क्षणभंगुर होत. म्हणून भरतकुलाला भूषण अशा अर्जुना, ते तूं ( शोक न करितां ) सहन कर. १४

But, O Arjuna, son of Kunti ! the contacts of the senses with their external objects causing cold and heat, pleasure and pain, *come and go. So they are not everlasting.* O son of Bharat family! endure them patiently. 14.

**इन्द्रियाणां विचरतां विषयेष्वपहारिषु ।**
**संयमे यत्नमातिष्ठेद्विद्वान्यन्तेव वाजिनाम् ॥** मनु. २-८८

" *Matters be ended as they be friended* " —*T. Starkey.*

" *Present joys are sweeter for past pain ;*
*To love and Heaven by sufferings we attain* " —*Granvitte.*

**९. यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥**

**व्यथयन्ति**—व. तृ. अ., प्रयो. रूप. pre. 3rd. pl; cau. of व्यथ्–उ. प दुःख देणें, U. to pain, vex. पुरि पुर्यां वा पूर्णत्वेन शेते, पुरुः सराति ( ब्रह्म जानाति ) वा इति **पुरुषः**. **ऋषभः**—सर्वोत्तम, सर्वश्रेष्ठ ( समासाच्या शेवटीं ); बैल, The best or most excellent ( at the end of a comp. ); a bull. पुरुषांणा ऋषभः ( ष. त. स. ) **पुरुषर्षभः**, तत् संबुद्धौ हे **पुरुषर्षभ** ! दुःखं च सुखं च दुःखसुखे (द्वं.स.), समे दुःखसुखे यस्य (ष.ब.स.) सः **समदुःखसुखः**—दुःख व सुख सारखींच मानणारा, Balanced in pain and pleasure. धियं राति, धियं ईरयति वा इति **धीरः**—निश्चयी किंवा शूर पुरुष; ज्ञानी. A steadfast or brave man; the wise. **धीरो मनीषी ज्ञः प्राज्ञः** इति निघंटुः. न मृतं **अमृतं**—न मेलेले; not dead. अमृतस्य भावः **अमृतत्वम**—मोक्ष, अमरत्व; salvation, immortality. **कल्पते**—व. तृ. ए. pre. 3rd. sing. of क्लृप्–१ आ. समर्थ किंवा योग्य-होणें-असणें. 1 A. to befit, be able or adequate for.

**अन्वयः**—पुरुषर्षभ, यं हि समदुःखसुखं धीरं पुरुषं एते ( मात्रास्पर्शाः ) न व्यथयन्ति सः अमृतत्वाय कल्पते ।

**अर्थः**—कारण, हे नरश्रेष्ठा अर्जुना, सुखदुःख समान मानणाऱ्या ज्या ज्ञानी पुरुषाला बाह्यसृष्टीचे इंद्रियांशीं होणारे हे संबंध उपद्रव देऊं शकत नाहींत, **तोच मोक्षाला अधिकारी** समजला जातो. १५.

For, O best of men ! that wise man alone to whom pain and plasure are alike, and whom these contacts of matter with the senses never afflict, is fit for Salvation. 15.

सः **कर्मकृत**, न कर्मकृत् **अकर्मकृत्**—कर्म न करणारा. Free from action, actionless. **कार्यते**—( प्रयोजक कर्म. causal *pass.* of कृ–करणें, to do )–करविलें जातें. Is made to do. न वशः, नास्ति वशं आयतत्त्वं यस्य वा सः **अवश** ( न. स. )—परस्वाधीन, परतंत्र. Not having one's own power or will; dependent, helpless. प्रकर्षेण करोति सा **प्रकृतिः**, प्रकृतितः जाताः, प्रकृत्याः जायन्ते इति वा **प्रकृतिजाः**—जन्मतः किंवा मुळचेच असलेले, निसर्गसिद्ध. Born of nature, original तैः प्रकृतिजैः ( गुणैः )।

**अन्वयः**—हि कश्चित् क्षणमपि अकर्मकृत् जातु न तिष्ठति। हि सर्वः अवशः ( सन् ) प्रकृतिजैः गुणैः कर्म कार्यते।

**अर्थ—कोणीहि एक क्षणभरदेखील कर्म केल्यावांचून कधींहि राहत नाहीं**. कारण, सर्व ( प्राणीमात्र ) परावलंबी असल्यानें निसर्गसिद्ध स्वभावगुणच त्याजकडून कर्म करवितात.—कर्म टाळूं म्हटल्यानें कोणाला टळत नाहीं, **प्रकृति** त्याजकडून तें करवून घेतेच. ५

For nobody can ever remain, even for a moment, inactive and everyone being helpless ( under the nature's control ) is made to do the action, by the qualities born of Nature.—None can avoid the action of his own accord; the Natural impulses drive him to do it. 5

**विनीतविनयस्यापि प्रकृतिर्न विधीयते।**
**प्रकृतिं गूहमानस्य निश्चयेन कृतिर्ध्रुवा॥** –रामा. उ. ५९–२६.

*"No man is born into the world whose work*
*Is not born with him. There is always work*
*And tools to work withal, for those who will;*
*And blessed are the horny hands of toil."* —*J. R. Lowell.*

**३३. नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः।**
**शरीरयात्रापि च ते न प्रसिध्द्येदकर्मणः॥ ८॥**

नित्यं यः यस्मिन् कर्मणि अधिकृतः तत् **नियतम्**—निश्चित, ठराविक, नेहमींचें; स्वधर्म, वर्ण व आश्रम यांस उचित असें कर्म. Fixed alloted, permanent, regularly, always; the duty well suiting to one's religion, class and period of life. ( **नियतं**—नित्यं श्रौतस्मार्तरूपं-**ब्रह्मानंदगिरी**-टीका; विध्युक्तं कर्म नित्यं वा नैमित्तिकं वा ईश्वरप्रीत्यर्थं चित्तशुध्द्यर्थं च-**शंकरानंदः**;

वर्णाश्रमोचितम्-आनंदतीर्थः). कुरु—आज्ञा० द्वि. ए. Impera. 2nd sing. of कृ-८ उ. करणें. 8 U. to do. अतिशयेन प्रशस्तं इति **ज्यायस्**—अधिक बरें. Comp. of प्रशस्य, वृद्ध. More excellent or worthy. न कर्म **अकर्म** (न. स.)—कर्म न करणें. Inaction. शरीरस्य यात्रा (धारणपोषणं) ष. त. स. **शरीरयात्रा**—उपजीविका, जीवन, जगणें. Maintenance of body, means of bodily sustenance. **प्रसिध्येत्**—विध्यर्थ तृ ए. Pot. 3rd sing. of प्र+सिध्-४ प. शेवटास जाणें. 4 P. to be accomplished, be got or obtained.

**अन्वयः**—हि अकर्मणः ते शरीरयात्रा अपि न प्रसिध्येत्। अकर्मणः च कर्म ज्यायः (अस्ति। तस्मात्) त्वं नियतं कर्म कुरु।

**अर्थः**—कारण, कर्म न करणाऱ्या तुझी जीवितयात्रा (उदरंभरण) देखील चालणें शक्य नाहीं. कर्म न करून स्वस्थ बसण्यापेक्षां कर्म करीत राहणेंच अधिक श्रेयस्कर आहे. म्हणून तूं आपलें (धर्माश्रमविहित असें) विहित कार्य करूं लाग. ८

For, by desisting from the alloted action you cannot maintain even your body. The action is counted superior to inaction. Therefore, perform your permanently allotted duty (which is well suited to your religion, class and the stage of life.). 8

**यत्तु कार्यं भवेत्कार्यं कर्मणा तत्समाचर।**
**हीनचेष्टस्य यः शोकः स हि शत्रुर्धनंजय॥** – म.भा.द्रो. ८०-८.

*"Man hath his daily work of body or mind*
*Appointed, which declares his dignity,*
*And the regard of Heaven on all his ways;*
*While other animals unactive range."* —*Milton.*

[पुढील दोन श्लोकांत **यज्ञाचें महत्त्व** व त्याची **परिणाम-परंपरा** प्राणिमात्राच्या उत्पत्तीपर्यंत सांगितली आहे. यावरून यज्ञ-होमांची आवश्यकता व मानवी जीविताशीं असलेला त्यांचा निकट संबंध हीं चांगलीं ध्यानांत येतात. **In the following two verses, the importance of a sacrifice and its successive results up to the origin of the living being have been described. By this, one can imagine the necessity of sacrificial performance and its close contact with the worldly life.**]

**३४. अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः॥ १४॥**

अद्यते इति **अन्नम्**—खाद्य पदार्थ. Food (in general). तस्मात् अन्नात्. **भवन्ति**—होतात, उत्पन्न होतात. Become, are born. **भूतानि**—(भूतम्) प्राणीमात्र; मानवी, दैवी अथवा जड व्यक्ती. Creatures; human, divine or even inanimate beings. **भूतम्**—भू. धा. p. p. of भू-होणें, असणें. To become, be; न. प्राणी, जीव. *n.* Any living being, a creature. **पर्जन्यः**—पाऊस; पावसाचा ढग. Rain; a rainy or thundering cloud. सम्यक् भवति इति **संभव**—उत्पत्ति. Production. अन्नस्य संभवः **अन्नसंभवः** (ष. त. स.)-अन्नाची उत्पत्ती. Production of food. **यज्ञः**—(यज्-१ उ) याग, होम, आहुती देणें; आत्मा, ब्रह्म. Sacrifice, sacrificial rite, any offering or oblation; the eternal soul. सम्यक् उद्भवः **समुद्भवः**; कर्मभ्यः—यागहोम—दानादिभ्यः—समुद्भवति इति **कर्मसमुद्भवः**—कर्मांपासून उत्पन्न झालेला. Produced from, or born of Actions.

**अन्वयः**—अन्नात भूतानि भवन्तिं। पर्जन्यात् अन्नसंभवः (भवति)। यज्ञात् पर्जन्यः भवति, यज्ञः (च) कर्मसमुद्भवः (अस्ति)।

**अर्थः**—अन्नापासून प्राणिमात्र उत्पन्न होतात, पर्जन्यामुळें अन्न तयार होतें, यज्ञापासून मेघ-वर्षाव होतो व यज्ञ तर कर्मांमुळेंच उद्भवतात. (सत्कर्मांचें अनुष्ठान अथवा परिपालन हाच **यज्ञ** होय.) १४

From food are all creatures born; from rain is the production of food; rain is the outcome of sacrifice and sacrifice is the (only) result of Actions. (Performance of one's own *duty* or benevolent *action* is itself a *Yajna* or sacrifice). 14

**अग्नौ प्रास्ताहुतिः सम्यगादित्यमुपतिष्ठते।**
**आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजा॥** —मनु. ३-७६.

**यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानिधर्माणि प्रथमान्यासन्।**
**तेहनाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः॥**
—ऋग्वेद.

**हविरावर्जितं होतस्त्वया विधिवदग्निषु।**
**वृष्टिर्भवति सस्यानामवग्रहविशोषिणाम्॥** —रघु. १-६२.

" *Life is Act and not to do is death.*" —*Lewis Morris.*

" *Actions are our epochs.*" —*Byron.*

**३५. कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

**कर्म**—( कृ-५ उ., ८ उ. ) कर्मन्—( नित्य नैमित्तिक किंवा काम्य ) धार्मिक आचार, कार्य; व्यापार. A Religious rite ( it may be either perpetual, occasional or optional ), action; business. **ब्रह्म**—ब्रह्मन्-प्रकृति, परमात्मा, ईश्वर, वेद. Supreme Being, God, The Vedas ( the holy scriptures of Hindus ). ब्रह्म एव उद्भवः. ब्रह्मणः उद्भवः यस्य वा तत् **ब्रह्मोद्भवम्** ( ब. स )—वेदांपासून झालेलें, उद्भवलेलें. **विद्धि**—( आज्ञा. द्वि. ए Impera. 2nd. sing. of विद्-२ प. जाणणें, समजणें. 2 P. to know, understand.)-ध्यानांत धर, जाण Keep in mind, know, understand. न क्षरति इति **अक्षरम्**-ॐ, ओंकार, प्रणव. Om, the sacred syllable. **अक्षरः**—शाश्वत, परमात्मा. The imperishable Supreme Being. वेदाख्यं ब्रह्म **अक्षरात्प्रणवात्समुद्भूतम्.** -**ब्रह्मानंदगिरिः**. अक्षरात्परमात्मनः **सकाशात्** निःश्वासरूपेण स्वयमेवाविर्भूतमत एव नित्यमपौरुषेयं **ब्रह्म वेदं** विजानीहीत्यर्थः-**शंकरानंदः**. अक्षरः एव समुद्भवः, अक्षरात् एव समुद्भवः यस्य वा तत् **अक्षरसमुद्भवम्** ( ब. स. )—परमात्म्यापासून झालेलें. Sprung from God, the Supreme Being. सर्वेषु वस्तुषु गतं तत् **सर्वगतम्**—सर्वव्याप्त, सर्वत्र भरून असलेलें. All-pervading. **यज्ञः**—( यज् )-होम, याग, धर्मकृत्य, स्वार्थत्याग. A sacrificial rite; any offering or oblation, any pious or religious act; sacrifice. प्रत्येक गृहस्थाश्रमी मनुष्याला व विशेषतः ब्राह्मणाला पांच प्रकारचे यज्ञ पार पाडावे लागतात, ते.-भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ व ब्रह्मयज्ञ. यांनाच **पंचमहायज्ञ** म्हणून समुच्चयवाचक नांव आहे. Every householder, particularly a Brahmin has to perform such five ritual sacrifices every day, namely :—1. An oblation or offering to all created beings, 2. hospitality or hospitable reception to guests, 3. an offering libations of water every day to the deceased ancestors, 4. a sacrifice to the superior gods, made by oblations to fire or through fire to gods, 5. the teaching and reciting of the Vedas-the scriptures of the Hindus. These are collectively called the five "Great Sacrfices."

**अध्यापनं ब्रह्मयज्ञः पितृयज्ञस्तु तर्पणम् ।**
**होमो दैवो बलिर्भौतो नृयज्ञोऽतिथिपूजनम् ॥** -मनु. ३-७०

**प्रकर्षेण** तिष्ठितम् इति **प्रतिष्ठितम्** ( प्र+स्था १ आ. कायम असणें. 1 A. to stand firmly or be established )-कायम असलेलें, ठेवलेलेंच. Firmly situated of placed.

**अन्वयः**—कर्म ब्रह्मोद्भवं ( अस्ति इति ) विद्धि । ब्रह्म अक्षरसमुद्भवम् ( अस्ति ) । तस्मात् सर्वगतं ब्रह्म यज्ञे नित्यं प्रतिष्ठितम् ( इति जानीहि । )

**अर्थः**—कर्म प्रकृतिपासून उद्भवलें आहे व प्रकृति अविनाशी अशा परमात्म्या-पासून निर्माण झाली आहे हें तूं पक्कें समज. ( शिवाय लक्षांत असूं दे कीं, ) या कारणामुळेंच, सर्वत्र भरून राहिलेलें असें जें हें **ब्रह्म** ( परमोच्च प्रकृतिरूप तत्त्व ) तें यज्ञाच्याच ठायीं नेहमीं वास करीत असतें. १५

Know that the Action has its origin in the Prakriti (matter), and that the matter ( material world ) springs from the imperishable God. Therefore, ( you keep in mind that ) the all-pervading Brahma, the Eternal and material cause of the world is ever present in ( centred round ) the sacrifice. 15

**यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति ।**
**यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति तद् ब्रह्म ॥** —कृष्णय. तै.

**सत्यं ज्ञानमनन्तमानन्दं ब्रह्म ॥** —अथ. सर्वोपानिषद्

**यज्ञो वै भुवनस्य नाभिः ।** —तै. ब्रा. ३–९–५–५.

**निधत्से हुतमर्काय स पर्जन्योऽभिवर्षति ।**
**ततोऽन्नानि प्रजास्तेभ्यस्तेनासि जगतः पिता ॥** —कुमा.१०-२०

" *The eternal Sacrifice of one generation is the civilization to the next.* " —*Bulwer Lytton.*

" *God is everywhere ! the God who framed*
*Mankind to be one mighty family,*
*Himself our Father, and the world our home.* " —*Coleridge.*

**१६. कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।**
**लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥**

**कर्मणा**—( तृ. ए. Instr. sing. of कर्मन्-क्रिया, व्यापार, काम. Action business, work. ) कर्मामुळें, कार्य केल्यानें. By action. सम्यक् सिद्धिः **संसिद्धिः**—यशःप्राप्ति, मोक्ष, पूर्णता. Accomplishment, salvation, per-

fection. ( ताम् ) संसिद्धिं आस्थिताः—सिद्धि ज्यांना प्राप्त झाली आहे ते. Those who attained perfection. जनकः आदिः येषां ते जनकादयः ( ष. ब.स. )—जनक, अश्वपति वगैरे. Janak, Ashwapati and others-**शांकर भाष्ये**. **जनक**—सीतेचा बाप व विदेही जनक. हा मोठा विद्वान्, भगवद्भक्त व धनुर्विद्याप्रवीण होता. रामानें सीतात्याग केल्यावर यानें आपलें आयुष्य साधुवृत्ति व तत्त्वज्ञान यांत घालविलें. King of Videha ( नेपाळ ) and foster father of Sita. He was remarkable for his knowledge, God-worshipping and military heroism. After the abandonment of Sita by Rama, he became an anchorite and spent his life-time in philosophical discourses. **अश्वपतिः**—सावित्रीचा पिता. सावित्री देवीच्या पूजनानें व वरप्रसादानें त्याला, पुत्राची इच्छा असूनहि एक सुंदर कन्या झाली. म्हणून मुलीचें नांवहि सावित्रीच ठेविलें. पुढें सत्यवानाशीं तिचा विवाह झाल्यानंतर एके दिवशीं यमराज तिच्या पतीचा आत्मा नेत असतां तिनें त्याची आराधना करून अनेक वर-प्रसाद मागितले; त्यांत पतीला सजीव करून घेऊन स्वतःच्या बापाची पुत्रप्राप्तीची इच्छाहि, या प्रसादानें त्याला १०० पुत्र देऊन पुरी केली. Ashwapati, the father of Savitri worshipped Devi Savitri and by Her grace, he had a lovely daughter instead of a son. So he named her after the Deity, Savitri. After her marriage with Satyawan, Yama, the God of Death came one day to carry her husband's Soul ( spirit ); but she appealed to him so eloquently that Yama, in return, granted her request after request, and consequently she forced him to restore her husband with Soul ( spirit ) and grant with other ones a boon of hundred sons to her father as he desired for. संगृह्यतेऽस्मिन्निति **संग्रहः**, लोकस्य उन्मार्गप्रवृत्तिनिवारणं इति **लोकसंग्रहः** (शंकराचार्यः)—एकादें उच्च ध्येय डोळ्यापुढें ठेवून त्याच मार्गानें समाजाला बरोबर घेऊन जाणें. Taking masses along a right path with high ideals at heart. लोकाय लोकस्य वा संग्रह. **लोकसंग्रहः** ( त. स. )—लोकांचें कल्याण. The welfare of the world. सम्यक् पश्यति इति **संपश्यत्** ( संपश्यन् )—व. धा. pre. p. of सम् + दृश्–१ प. पहाणें. 1 P. to look at.–पाहणारा, विचार करणारा. Looking at, considering. **कर्तुं**—हेत्व. अ. *Inf.* of कृ–करणें, to do. **अर्हसि**—व. द्वि. ए. pre. 2nd. sing. of अर्ह्—१ प. योग्य होणें–असणें. 1 P. to deserve.

**अन्वयः**—हि जनकादयः कर्मणा एव संसिद्धिं आस्थिताः । **लोकसंग्रहं** अपि संपश्यन ( त्वं कर्म ) कर्तुं एव अर्हसि ।

**अर्थः**—कारण, स्वकर्तव्य पार पाडल्यानेंच जनक ( व अश्वपति ) इत्यादिकांना यशःसिद्धि प्राप्त झाली आहे. लोककल्याणाच्या ( **लोकसंग्रहाच्या** ) दृष्टीनें विचार केलास, तरीहि तुला आपलें कार्य करीत राहणेंच जरूर व योग्य आहे. २०

Because, by performance of action alone, persons like Janaka (and Ashwapati) and others attained to perfection. Also with a view to the welfare of the world, you are entitled to do your duty.—It behoves you always to do the duty. 20

**अथवा कृतकृत्योऽपि लोकानुग्रहकाम्यया ।**
**शास्त्रीयेणैव मार्गेण वर्तेहं का मम क्षतिः ॥** –पंच. –तृप्ति. २६८.

**विवेकी सर्वदा मुक्तः कुर्वतो नास्ति कर्तृता ।**
**अलेपवादमाश्रित्य श्रीकृष्णजनकौ यथा ॥** –स्मृति.

**अनवाप्तमवाप्तव्यं न ते किंचन विद्यते ।**
**लोकानुग्रह एवैको हेतुस्ते जन्मकर्मणोः ॥** –रघु. १०–३१.

**स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि ।**
**आराधनाय लोकस्य मुञ्चतो नास्ति मे व्यथा ॥** –उत्त. १-१२.

*"Our country's welfare is our first concern,*
*And who promotes that best–best proves his duty."*

—*Havard Regulus.*

*"Action is the highest perfection and drawing forth of the utmost power, vigour, and activity of man's nature.........And indeed doing is nothing else but the noblest improvement of being."*

—*South*

**१७. यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरा जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥**

**यत् यत्**—जें जें. Whatsoever. **आचरति**—व. तृ. ए. pre. 3rd. sing. of आ+चर–१ प. वागणें; करणें. 1 P. to act, behave; to do. अतिशयेन प्रशस्यः **श्रेष्ठः**—अत्यंत उत्तम पुरुष–मनुष्य. The best or most excellent man. जन्यते इति **जनः**—मनुष्य; लोक. A man; the people. **सः** ( तद् )—तो. He. प्रकर्षेण मीयते अनेन इति **प्रमाणम्**—पुरावा, आधार; सत्य. Standard, proof; true or accurate notion, authority. **कुरुते**—व. तृ. ए. pre. 3rd. sing. of कृ–करणें. To do. **तत्**—तें. That. **अनुवर्तते**—व. तृ. ए.

pre. 3rd. sing. of अनु+वृत्--१ आ. ( कधीं प. )-प्रमाणें वागणें-करणें; अनुसरणें. 1 A. ( sometimes P. ) to follow, act according to, be guided by.

**अन्वयः**—श्रेष्ठः यत् यत् आचरति तत् तत् एव इतरः जनः ( आचरति ) । सः यत् प्रमाणं ( लौकिकं वैदिकं वा ) कुरुते तत् ( एव ) लोकः (अपि) अनुवर्तते ।

**अर्थः**—मोठा ( ज्ञानी ) मनुष्य ज्याप्रमाणें वागतो त्याचप्रमाणें इतर लोकहि वागतात. तो जी गोष्ट आधारभूत म्हणून प्रमाण मानितो, तिलाच सामान्य लोक अनुसरून वागतात–त्याच्याप्रमाणेंच आचरण करितात. २१

Whatever a great man does, the same is done by other people as well. He sets up an example, and it is followed by the world. ( Generally, the people copy a great man. ) 21

**राज्ञि धर्मिणि धर्मिष्ठाः पापे पापाः समे समाः ।**
**राजानमनुवर्तन्ते यथा राजा तथा प्रजाः ॥** –चाणक्यनीति.

**ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः अलूक्षाः धर्मकामाः स्युः । यथा ते वर्तेरन् । तथा वर्तेथाः । एष आदेशः । एष उपदेशः ।** –तैत्ति. उप. १.

**यद्यदाचराति श्रेयानितरस्तत्तदीहते ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥** –भाग. ६–२–४.

*" The example of a great prince carries weight and is followed. When Angustas was drinking, Poland was drunk. "*

*—Fredrick the Great.*

*" The example of good man is visible philosophy. "*

*—Fielding's Proverb.*

*" Examples lead us, and we likely see;*
*Such as the prince is, will his people be. "*

*—Herrick–Hesperides, 791.*

*" One bad example will spoil many precepts. "*

*—Maunder's Proverbs.*

**३८. न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।**
**जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥**

भिद्यते अनेन इति भेदः, बुद्धेः भेदः ( ष. त. ) बुद्धिभेदः—गैरविश्वास, अश्रद्धा. Unsettling or change of mind, want of faith, distrust; dissen-

sion. **जनयेत्**—प्रयो. विध्य. तृ. ए. *Caus.* pot. 3rd. sing. of जन्-(४ आ.) उत्पन्न करणें. To produce, cause. न जानन्ति ते अज्ञाः (तेषां अज्ञानां)—अजाणते; अडाणी. Unknowing; ignorant. कर्माणि संगः यस्य (ष. ब.) सः **कर्मसंगिन्**--कर्मांत आसक्त असलेला किंवा गढून गेलेला Attached to action worldly duties. **जोषयेत्**--जुष्-६आ. प्रयो.--खुषीनें किंवा प्रेमानें करविणें. 6 A. *Caus.*-to fondle for work. सर्वं च तत् कर्म च **सर्वकर्म** (क. धा. स.), तानि **सर्वकर्माणि**. वेत्ति इति **विद्वान्** (विद्-जाणणें-to know)—जाणता, शहाणा, ज्ञानी: The wise, a learned man. **युक्तः** (भू. धा p. p. of युज्-४ आ., ७ उ. व प्रयो. चित्त एकाग्र करणें, जोडणें; आचरणें. 4 A., 7 U. & *Caus.* to concentrate one's attention upon, to join; to perform or achieve. )—एकाग्र, तत्पर; सावधान; स्वस्थ. Concentrated with faith or devotion; attentive; firm, resolute. सम्यक्—यथाशास्त्र—आचरति इति (समाचरत्) **समाचरन्**--वागत किंवा करीत राहून. Acting, doing.

**अन्वयः**—विद्वान् कर्मसंगिनां अज्ञानां बुद्धिभेदं न जनयेत, ( किं तु विद्वान् ) युक्तः समाचरन् ( च तेषां अज्ञानिनां श्रद्धां उत्पाद्य ) सर्वं कर्माणि जोषयेत् ।

**अर्थः**—शहाण्या मनुष्यानें, कर्मांच्या ठायीं आसक्त अशा ( सामान्य व ) अज्ञान लोकांचा कर्माविषयीं भलताच गैरसमज करूं नये; तर उलट, त्यानें स्वतः सावधान चित्तानें आपलीं कर्तव्यें करीत राहून, दुसऱ्याकडूनहि प्रेमानें तशीं तीं करवून घ्यावीं. २६

The enlightened man should not unsettle the belief of the ( ordinary and ) ignorant people who are strongly attached to their works; but contrariwise, himself performing his own duties devotionally, he should fondle them for works. 26

( The wise should make the people do their duty through love for it, by setting his own example. )

**मतिर्दोलायते सत्यं सतामपि खलोक्तिभिः ।** -हितो ४-५९.

*" Dissensions like small streams are first begun;*
*Scarce seen they rise, but gather as they run. "*

*—Grath-The Dispensary.*

*" Ignorance is the mother of devotion. "* *—Jeremy Taylor.*

*" To worship is a black stone because it fell from heaven may not be wholly wise, but it is half way to being wise, half way to worship heaven itself... It is not true folly to think that stones live but it is to think that souls do not. "* *—Ruskin.*

**३९. प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।**
**अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ २७ ॥**

**प्रकृतिः**—माया ( वेदांत ); पंचभूतात्मक व सत्त्व-रज-तमादि त्रिगुणात्मक विश्वाचें उगमस्थान ( सांख्य ); निसर्गस्वभाव, मूळ अवस्था. The illusion or unreality (Vedant Phil.); The original source of the Material world, consisting of the three essential qualities: सत्वं, रजस् and तमस् (Sankhya Phil.); Nature; Natural condition or form. [ **प्रकृतिः माया** सत्वादि गुणद्वारा आकाशादि महाभूतरूपेण परिणता—**शंकरानंदी व्याख्या**]. क्रियन्ते तानि क्रियमाणानि-**क्रियमाणम्**—( वर्त कर्मणि धातु. pre. *pass.* p. of कृ–८ उ. करणें, 8 U. to do)–जें जें केलें जातें तें. Whatever is done or wrought. **गुणाः**—सर्व वस्तुमात्राच्या ठायीं असलेले सत्त्व, रज, तमादि स्वभावधर्म किंवा लक्षणें. The three properties belonging to all created things:—सत्त्वं, रजस् and तमस्. **सर्वशः**—अ. पूर्णपणें. *ind.* Entirely. 'अहं कर्ता, अहं करोमि' इति भावः **अहंकारः**—'मीच सर्व कांहीं करितों' अशी आत्मप्रौढी, अभिमान. Self-conceit or arrogance that "I am the doer"; egoism. विशेषेण मूढः **विमूढः**—मोहित; मूर्ख. Confounded; tempted, deluded; foolish, dull. अहंकारेण विमूढः ( तृ. त. स. ), अहंकारविमूढः आत्मा यस्य सः **अहंकार—विमूढात्मा** ( ष. ब. स. ). **आत्मा** ( आत्मन् )—मन; बुद्धि; जीवतत्त्व किंवा चलनवलनादि कार्ये करणारी मुलभूत शक्ति. Mind; reason; The soul, the principle of life and sensation—**आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु–कठोपनिषद्.** **अहंकारविमूढात्मा**—ज्याचें मन किंवा बुद्धि अहंभावानें मोहित झाली आहे तो. He whose mind is deluded by egoism. **मन्यते—व.** तृ. ए. pre. 3rd sing. of मन्—४ आ. विचार करणें; मानणें, जाणणें. 4 A. to think, consider; know.

**अन्वयः**—कर्माणि प्रकृतेः गुणैः सर्वशः क्रियमाणानि ( सन्ति किन्तु ), अहंकारविमूढात्मा "अहं कर्ता ( अस्मि )" इति मन्यते ।

**अर्थः**—कर्मे सर्वथैव निसर्गसिद्ध सत्त्वरजतमादि गुणांकडून केलीं जातात. (खरी स्थिति अशी असतांना ) दुरभिमानानें मोहमूढ बनलेला मनुष्य, "कर्मकर्ता ( व कर्मकारण ) मीच आहें," असे स्वतःला समजतो. २७

**All works are entirely done by the natural dispositions. ( properties ) But the fool, deluded by egoism, thiks, "I am the doer ( and the cause of all actions )". 27**

**बहुरूप इवाभाति मायया बहुरूपया ॥**
**रममाणो गुणेष्वस्यां ममाहमिति मन्यते ॥** –भाग. २–९–२.
**स एष यर्हि प्रकृतेर्गुणेष्वभिविषज्जते ।**
**अहं क्रियाविमूढात्मा कर्तास्मीत्यभिमन्यते ॥** –भाग.३-२७-२.

" *Nature is prime impulse, and earthly appetite.*" —*Browning.*
" *Pride, the never-failing vice of fools.*" —*Pope.*
" *Nature which is the time-vestu e of God, and reveals Him to the wise, hides Him from the foolish.*" —*Carlyle.*

**४०. मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।**
**निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥**

**मयि**—मम. ए. Loc. sing. of अहम्—मी. I. **कर्माणि**--२ प्रकारचीं कर्तव्यें:--वैदिक व लौकिक; किंवा नित्य, व नैमित्तिक. Two-fold duties:- *Vedic* and *worldly*, or usual and occasional. सम्यक् न्यस्य इति **संन्यस्य**--( सं + नि + अस्–४ आ. 4 A. ) धा. सा. अ. टाकून, अर्पण करून. *Ger.* Having abandoned or surrendered. आत्मानं अधिकृत्य इति **अध्यात्मम्**—अध्यात्मं च तत् चेतः **अध्यात्मचेतः** ( क. धा. स. ), तेन **अध्यात्मचेतसा**--ज्ञानयुक्त व शुद्ध अंतःकरणानें; आत्मीय भावना व विवेक यांनीं युक्त अशा मनानें. With a thought full of knowledge, purity of mind, and Supreme-self. निर्गताः आशाः यस्मात् सः **निराशीः** ( ब. स. )--( कर्मफलाची ) आशा न बाळगणारा. Free from hope ( of the fruit of Action ). 'मम इदं' इति भावः **ममः** "माझें माझें" असें म्हणणें; ममत्व; स्वार्थ. Mineness; selfishness. निर्गतः ममः यस्मात् सः **निर्मम** —ममत्वरहित. Free from selfishness. **भूत्वा**—( धा. अ *Ger.* of भू–होणें, असणें. To become, to be. ) होऊन. Becoming, being. **युद्ध्यस्व**—( आज्ञा. द्वि. ए. Impera. 2nd. sing. of युध् ४ आ. 4 A. ) तूं युद्ध कर. ( You ) do fight. **ज्वरः**—मानसिक दुःख. Mental pain. विशेषेण गतः ज्वरः यस्य यस्मात् वा सः ( ब. स ) **विगतज्वरः**—मानसिक दुःख अथवा शोक न करणारा. One whose mental fever has gone away.

**अन्वयः**—( अर्जुन, ) सर्वाणि कर्माणि अध्यात्मचेतसा मयि संन्यस्य, निराशीः निर्ममः विगतज्वरः च भूत्वा युध्यस्व ।

**अर्थः**—( अर्जुना, तूं आपलीं ) सर्व कर्में ज्ञानयुक्त व शुद्ध अंतःकरणानें आणि आत्मीय भावनेनें मला अर्पण करून, व ( तूं स्वतः कर्मफलाची ) आशा, ममत्व आणि शोक टाकून देऊन, बेधडक युद्ध करूं लाग. ३०

O Arjuna, dedicate unto me all your actions, with a thought of knowledge, purity of mind and Supreme-self, and engage in battle boldly, being freed from any hope (of your action's fruit) and selfishness, and cured of mental pain. 30

**ईश्वरे भावितं कर्म तापत्रयचिकित्सितम् ।** -भाग. १-५-३०.

*"We shou'd surrender our passions, prejudices, and uncharitableness towards others. We should seek to win as much as we can from the common humanity of our adversaries. The good and the wise will pursue this course, and they will succeed."* —*Bramford.*

*"The arms are fair*
*When the intent of bearing them is just."* —*Shakespeare.*

*"Sleep after toyle, post after stormie seas,*
*Ease after warre, death after life, does greatly please."*
—*Spenser.*

*"Union with God can only be attained by the literal negation of self, by a kind of moral suicide."*
—*Plato and Platonism by Walled Pater.*

**४१. ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः ।**
**श्रद्धावन्तोनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥**

**मतम**—मत, विचार; उपदेश. Opinion; advice. **नित्यम्**—अ. नेहमीं. *ind.* Always. **अनुतिष्ठन्ति**—(व. तृ. अ. pre. 3rd pl. of अनु+स्था—१ प. व. आ. प्रमाणें करणं-आचरणें. 1 P. and A. to perform, to do-act according to.) प्रमाणें वागतात, अनुसरतात. Behave, perform or follow मनोः अपत्यानि पुमांसः **मानवाः**—लोक. The people, persons. **मनोर्वंशो मानवानां ततोऽयं प्रथितोऽभवत । ब्रह्मक्षत्रादयस्तस्मान्मनोर्जातास्तु मानवाः**—महाभारते. श्रद्धा विद्यते येषां ते **श्रद्धावन्तः** (ष ब. स.)—श्रद्धावान्, श्रद्धाळु, भक्तिमान्; विश्वासु. Full of faith; believing. न असूयन्ति इति ते **अनसूयन्तः**—मत्सररहित, द्वेष-हेवा नसलले. Free from jealousy or envy. **असूयति**—हा नामधातु, **असूया** (हेवा, द्वेष) ह्या नामापासून बनलेला असून परस्मैपदीं वर्त० तृ. पु. ए. आहे. नामाला य, **काम्य**, य व इ हे प्रत्यय जोडून, आणि शेवटच्या स्वरांत थोडा बदल होऊन हीं क्रियापदें बनतात, व तीं बहुधा वर्त०, परस्मै०, क्वचित् आत्म० असतात. Pre. 3rd sing. of the denominative, formed from **असूया** (envy, jealousy). The Deno. verbs are formed by

suffix य, काम्य, य and इ and by a slight change in the final vowel. Such verbs are generally found in the Present Tense and Parasmaipada, and sometimes in Atmanepada. **मुच्यन्ते**—कर्मणि व. तृ. अ. *pass.* pre. 3rd pl. of मुच्—१ आ. फसविणें 1 A. to cheat. मुंच्—६ उ. सोडणें, मुक्त करणें. 6 U. to release, set free. कर्मणि रूपें करतांना संबंध असणाऱ्या नामाची तृतीया किंवा पंचमी विभक्ति असावी लागते. Passive forms of मुच् govern instr. or abl.

**अन्वयः**—ये मानवाः श्रद्धावन्तः अनसूयन्तः ( सन्तः ) इदं मे मतं नित्यं अनुतिष्ठन्ति तेऽपि कर्मभिः मुच्यन्ते ।

**अर्थः**—जे लोक स्वतः श्रद्धाळु व मत्सररहित असून माझ्या या उपदेशाप्रमाणें आपलें आचरण ठेवितात, तेसुद्धां सर्व कर्मबंधनांपासून मुक्त होतात. ३१

Those who, full of faith and free from jealousy, ever follow this teaching of Mine, even they are released from the bonds of Actions. 31

**श्रुतिस्मृत्युदितं धर्ममनुतिष्ठन्ति मानवः ।**
**इह कीर्तिमवाप्नोति प्रेत्य चानुत्तमं सुखम् ॥** —मनु. २-९.

*"Faith builds a bridge from this world to the next."* —*Young.*

**४१. सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।**
**प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥**

**सदृशम्**—वि. प्रमाणें, सारखें, अनुरूप. नेहमीं ष. किंवा तृ. विभक्तीशीं संबंध. *adj.* Like; similar or according to; fit. Governs the Gen. or Instr. **चेष्टते**—व. तृ. ए. pre. 3rd. sing. of चेष्ट्—१ आ. आचरणें, करणें. 1. A. To be active, stir, behave. **स्वस्याः**—स्व ( आपलें, स्वतःचें ) या कर्तृवाचक सर्वनामाच्या **स्वा** या स्त्री. रूपाचें ष. ए. Gen. sing. of the fem. base **स्वा** from a reflexive *pron.* स्व ( one's own ). **स्वस्याः प्रकृतेः सदृशम्**—स्वतःच्या मूळ स्वभावानुरूप. In accordance with his or her own nature. ज्ञानं अस्य अस्ति इति, ज्ञानं विद्यते यस्य वा सः **ज्ञानवान्**—शहाणा, बरें-वाईट ओळखण्याला समर्थ असा, जाणता. The wise; a person having discriminating faculty. **प्रकृतिः**—मूळ स्वभाव; निसर्गदत्त गुण. Natural disposition; Nature. **यान्ति**—व. तृ. अ. pre. 3rd. pl. of **या**—२ प. जाणें. 2 P. to go. **भूतानि**—भूतं-प्राणिमात्र; सजीव, निर्जीव, किंवा दैवी वस्तुमात्र. A living being; any being-human, inanimate or

divine. निगृह्यन्ते जनाः अनेन इति **निग्रहः**—निश्चय, आग्रह, हट्ट; जबरी, इंद्रियें ताब्यांत ठेवणें. Determination, restraint, curbing; iniquilous action; keeping the senses in check. **करिष्यति**—द्वि. भवि. तृ. ए. 2nd *fut.* 3rd. sing. of कृ-८ उ. करणें. 8 U. to do.

**अन्वयः**—ज्ञानवान् अपि स्वस्याः प्रकृतेः सदृशं चेष्टते । भूतानि प्रकृतिं यान्ति । निग्रहः ( तत्र ) किं करिष्यति ?

**अर्थः**—( बऱ्या-वाईटाचें ज्ञान असलेला ) शहाणा मनुष्य देखील स्वतःच्या मूळ स्वभावाप्रमाणें वागत असतो आणि **सर्व प्राणिमात्र आपापल्या निसर्गदत्त गुणाप्रमाणें मूळच्याच वळणावर जातात.** तर मग अशा स्थितींत अट्टाहास किंवा ( नुसता इंद्रियांचा ) निग्रह यांचें काय चालणार ?—( निसर्गाविरुद्ध जाणें व्यर्थ आहे.) ३३

Even a wise man ( having discrimination ) has to behave in accordance with his own nature. All beings ( also ) have to follow their own natural disposition. What shall, then, restraint ( of senses ) avail ?—( It is of no use to behave against the Nature.) 33

**ज्ञानिनामपि चेतांसि देवी भगवती हि सा ।**
**बलादाकृष्य मोहाय महामाया प्रयच्छति ॥** —मार्कंडेयपुराणे.
**मात्रा स्वस्रा दुहित्रा वा न विविक्तासनो भवेत् ।**
**बलवानिन्द्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति ॥** —मनु. २–२१५.

*" Nor think, in Nature's state they blindly trod;*
*The state of Nature was the reign of God. "* —*Pope.*

*" Nature never did betray*
*The heart that loved Her. "* —*Wordsworth.*

*" The never-idle workshop of Nature. "* —*Mathew Arnold.*

**४३. श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

**श्रेयान्**—( तरभावदर्शक ) पु. प्र. ए. Nom. sing. of the compa. mas. form of प्रशस्य ) अधिक श्रेष्ठ–उत्तम. More praiseworthy. स्वः धर्मः स्वस्य धर्मः वा **स्वधर्मः**—आपलें कर्तव्यकर्म. One's own duty. विगतः गुणः यस्मात् सः **विगुणः**—गुणरहित, सदोष, वाईट. Destitute of merits, worthless,

bad. परस्य धर्मः (ष. त. स.) **परधर्मः**—दुसऱ्याचें कर्तव्य किंवा धर्म. The duty or religion of another. सुष्ठु अनुष्ठितः (सु+अनुष्ठितः) **स्वनुष्ठितः**—चांगल्या रितीनें आचरलेला. Well performed. निर्गतं प्राणरूपधनं यस्मात् तत् **निधनम्**—मरण, मृत्यु. The death. **श्रेयस्**—(प्रशस्य या वि० चें तरभावदर्शक न. प्र. ए. रूप. Nom. sing. of the compa. neu. form of प्रशस्य.)—चांगलें, अधिक बरें, उत्तम. Better. भयं आवहति इति **भयावहः**—भीतिदायक. Dangerous, risky.

**अन्वयः**—स्वनुष्ठितात् परधर्मात् विगुणः (अपि) स्वधर्मः श्रेयान् (अस्ति)। स्वधर्मे निधनं श्रेयः (किन्तु) परधर्मः भयावहः (अस्ति)।

**अर्थः**—परकीय धर्माच्या आचरणापेक्षां स्वतःचा धर्म (हिंसादिकांनीं) सदोष असला तरी त्याचें केलेलें आचरण अधिक हितकारी होय. आपल्या धर्माप्रमाणें कर्तव्य करीत असतांना मरण आलें तरी पुरवलें, परंतु परधर्म नको; कारण तो हानिकारक असतो. ३५

One's own duty (Law of Dharma), though destitute of merits (full of injury and killing), is better than that of another, well discharged. Better is death in performing one's own duties; but those of another bring danger in its train. 35

**धर्मेण पापमपनुदति।** —शंकराचार्याः

**धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मो धारयते प्रजा ।**
**एक एव सुहृद्धर्मो निधनेऽप्यनुयाति यः ।**
**शरीरेण समं नाशं सर्वमन्यत्तु गच्छति ॥** —हितो. –१–६६.

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥** –भ.गी.१८–४७.

*"The Religion of Duty is plain even to a child."*

—*Lord Avebury.*

*"The word of God in the lines of Duty is open as the face of Heaven."* —*J. Taylor.*

**४४. काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥**

काम्यते अनेन इति **कामः**—इच्छा; विषयलालसा. Desire; love of sensual enjoyment. क्रुध्यन्ते प्राणिनः अनेन इति **क्रोधः**—राग, रोष.

**Anger, wrath.** रजः च असौ गुणः च **रजोगुणः**—( क. धा. )—सत्त्व, रज आणि तम यांपैकीं दुसरा; प्राणिमात्रास क्रिया करण्याला उत्तेजन देणारा मुख्य गुण. The second of the three *gunas* or constituent qualities of all material substances; motion, the cause of the great activity seen in creatures. सम्यक् उद्भवः **समुद्भवः**—उत्पत्ति. Origin or birth. रजोगुणात् समुद्भवः यस्य सः ( ष. ब. स. ) **रजोगुणसमुद्भवः**—रजोगुणापासून उत्पन्न झालेला. Born of, or arisen from the quality of motion ( रजस् ). महत् अशनं ( विषयग्रहणं ) यस्य सः ( ष. ब. स. ) **महाशन**—अधाशी, खादाड. Consumer, gluttonous. पापं अस्य अस्ति इति **पाप्मा** ( पाप्मन् )–पापी. Sinful. महान् च असौ पाप्मा च (क. धा.), महत् पापं यस्मात् वा सः (ब. स.) **महापाप्मा**—अत्यंत दुष्ट, पापी. Very sinful or wicked. **विद्धि**—आज्ञा. द्वि. ए. Impera. 2nd. sing. of **विद्**—२ प. जाणणें. 2 P. to know. **इह**—अ. येथें, या संसारांत, या जगांत. *ind.* Here, in this worldly existence, in this world. वीरस्य भावः **वैरम्**—शत्रुत्व. Hostility. वैरं अस्य अस्ति इति **वैरी**—शत्रु. Hostile; an enemy. तम् वैरिणम् ।

**अन्वयः**—एषः कामः–एषः क्रोधः रजोगुणसमुद्भवः ( अस्ति )। एषः महाशनः महापाप्मा ( च अस्ति । अतः त्वं ) एनं इह ( संसारे ) वैरिणं विद्धि ।

**अर्थः**—हा काम–हा क्रोध रजोगुणापासून उत्पन्न झालेला असून अत्यंत खादाड ( कधींहि तृप्त न होणारा ) व दुष्ट असल्यामुळें या जगांत हा ( काम–क्रोध ) तुझा शत्रुच आहे, हें नक्की समज. ३७

It is desire, it is wrath, which is sprung from the quality of motion ( रजस्–Passion ). It is all-consuming ( gluttonous ) and all-polluting; and therefore, know that it is your enemy here in this world. 37.

**न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ।**
**हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥** –मनु. २–९४.

*" Blessed is the man that endureth temptation; for, when he is tried he will receive the crown of life."* —*Bible.*

*" The trustless wings of false desire."* —*Shakespeare.*

*" Let not the sun go down upon your wrath."* —*St. Paul.*

**४५. इन्द्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

**इंद्रियं**—ज्ञानाचें किंवा कर्माचें साधन, अवयव. An organ or faculty of sense. ( पहा अ. २–६०; see under chap. 2, verse 60. ). **पराणि**—पर–वि. अधिक चांगलीं, श्रेष्ठ; पलीकडचीं. *adj*. Higher, superior; beyond. **आहुः**—असें ज्ञात्यांनीं म्हटलें आहे. It is said by the wise. **आहुः**—हें व. तृ. अ. रूप. pre. 3rd. pl. of **ब्रू**—२ उ. किंवा **अह्**—बोलणें, बोलावणें. To speak, name, call. [ श्लोक ५१ पहा; see verse 51 ]. **परतस्**—अ. सर्वश्रेष्ठ, अत्युच्च. *ind*. The highest. **पर**, **परतस्**—यांचा संबंध नेहमीं पंचमी विभक्तीशींच असतो. Often with abl. case. **सः**—तो परमात्मा. The Supreme Brahma.

**अन्वयः**—इंद्रियाणि पराणि आहुः। इंद्रियेभ्यः मनः परं ( अस्ति )। बुद्धिः तु मनसः परा ( अस्ति )। यः (आत्मा) बुद्धेः तु परतः सः ( **परमात्मा** अस्ति )।

**अर्थः**—ज्ञानी लोक बाह्य विषयांपेक्षां इंद्रियांना अधिक श्रेष्ठ समजतात. इंद्रियांहूनहि मन श्रेष्ठ, मनाहून बुद्धीला प्राधान्य विशेष, आणि जो बुद्धीच्याहि पलीकडचा–सर्व श्रेष्ठ–**तोच परमात्मा** होय. ४२

It has been said by the wise that the *senses* are greater than the worldly or external objects; greater than the senses is the *mind*; greater than the mind is the *reason*; but what is beyond (greater than) the reason is *He* (the Supreme Soul). 42.

**इंद्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः।**
**मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः॥** –कठो. ३–१०.
**इंद्रियेभ्यः परं मनो मनसः सत्त्वमुत्तमम्।**
**सत्त्वादधि महानात्मा महतोऽव्यक्तमुत्तमम्॥** –कठो. ६–७.

"*In the soul*
*Are many lesser faculties, that serve*
*Reason as chief; among these Fancy next*
*Her office holds.*" —*Milton. Para. Lost, Bk. V.*

"*Reason is the rightful empress of the Soul.*" —*Pomfret.*

---

## अध्याय चवथा



'प्रत्येक प्राणिमात्र कर्म केल्यावांचून रहात नाहीं,' असा निसर्गाचा नियम असल्यामुळें, 'मी कांहीं करणार नाहीं अगर करीत नाहीं; स्वस्थ बसेन.' हें बोलणेंच मुळीं चुकीचें आहे. **अर्जुनास** युद्धप्रवृत्त करण्याकरितां तत्त्वज्ञानानंतर **भगवंताला** तिसऱ्या अध्यायांत ज्ञानोत्तर **कर्मयोग** सांगावा लागला. परंतु कर्म करण्यांतहि उच्चनीच पायऱ्या आहेतच. फलाशेनें कर्म करणें, व **सर्वांभूतीं आत्मा,** या विश्वबंधुभावनेच्या ज्ञानानें युक्त होऊन निरपेक्ष कर्म करणें यांत फरक आहे. दुसऱ्या प्रकारें म्हणजे **साम्यबुद्धीच्या ज्ञानानें प्रेरित** होऊन निरपेक्षबुद्धीनें कार्य करीत राहणें हें अधिक श्रेयस्कर असल्यानें या **ज्ञानकर्मांचा** उहापोह या अध्यायांत केला आहे. तसेंच, ज्ञानप्रेरित निष्काम कर्म ईश्वरचरणीं अर्पण करण्याचें महत्त्वहि याच अध्यायांत सांगितलें असल्यानें याला **ज्ञानकर्मसंन्यास-योग** म्हटलें आहे. कर्म करणें हें तर निसर्गाज्ञेनुरूप प्रत्येकाला भागच असून, त्यांत **ज्ञातेपणामुळें** स्वार्थबुद्धिहि सुटते, आणि विश्वबंधुत्व मनांत बाणतें, हा या ज्ञानकर्मसंन्यासाचा विशेष होय.

**४६. यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदाऽऽत्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥**

**यदा यदाः**--अ. ज्या ज्या वेळीं. *ind.* Whenever. **धर्मः**—(ध्रियते लोकोऽनेन, धराति लोकं वा)-वेदविहित कर्तव्यकर्म; चार वर्ण, चार आश्रम व सदाचार यांना अनुसरून असलेला **कर्तव्यमार्ग.** The duty defined by Vedic Religion; the law well-established and prescribed in conformity with the four castes, four life-stages and good conduct; the religion. ग्लायते (क्षीयते) अनया इति **ग्लानिः**—क्षीणत्व, दुर्बलता- Decay, decline **भवति**—व. तृ. ए., pre. 3rd. sing. of **भू**—१ प. होणें असणें. 1 P. to become, be. **भरतस्य** अपत्यं पुमान् **भारतः**, तत्संबुद्धौ हे **भारत** !—अरे अर्जुना ! O Arjuna ! दुष्यंत आणि शकुंतला यांचा मुलगा **भरत.** हाच पुढें चक्रवर्ती सम्राट् झाला, आणि त्याच्या नांवावरूनच हिंदुस्थानचें प्राचीन नांव **भरतखंड** असें पडलें. कौरव व पांडव हे याचेच वंशज असल्यानें त्यांनाहि कधीं, भरतवंशोत्पन्न म्हणून **भारत** या नांवानें संबोधिलें जातें. या वंशजांचा इतिहास म्हणजेच **महाभारत** ग्रंथ होय. Bhârat was the son of Dushyanta and Shakuntalâ, who became a universal monarch, ancient India being called Bhârata-

varsha after him. He was the remote ancestor of the Kauravas and Pândavas, and therefore, they are called, sometimes Bhâratâs. The Mahâbhârata is the history of his descendent Kauravas and Pândavas. अभितः उत्थानम्-**अभ्युत्थानम्**—वाढ, वृद्धि. Rise, elevation. न धर्मः **अधर्मः** ( न. स. )-तस्य **अधर्मस्य**. **आत्मानम्**—द्वि. ए. acc. sing. of आत्मन् ( मी, स्वतः. I, myself ). **सृजामि**—व. प्र. ए. pre. 1st. sing. of **सृज्**—६ प. उत्पन्न करणें, जन्म देणें-घेणें. 6 P. to create, produce or beget ( progeny &c. ).

**अन्वयः**—हि भारत, यदा यदा धर्मस्य ग्लानिः भवति, अधर्मस्य च अभ्युत्थानम् ( भवति, तदा ) तदा अहम् आत्मानं सृजामि ।

**अर्थः**—हे भरतकुलोत्पन्न अर्जुना, ज्या ज्या वेळीं धर्माला क्षीणत्व प्राप्त होतें, व अधर्माचें प्राबल्य वाढत जातें, त्या त्या वेळीं **मी स्वतः** जन्म घेतों. ( मायेमुळें **मी स्वतःच** अवतार घेऊन पृथ्वीवर प्रकट होतों ). ७

Whenever there is a decline of Law and duty, O Arjuna, the descendant of Bharata ! and an elevation of lawlessness, then I incarnate Myself. ( Through love, I beget Myself and descend on the Earth in a form of Incarnation ). 7

**वेदः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ।**
**एतच्चतुर्विधं प्राहुः साक्षाद्धर्मस्य लक्षणम् ॥** —मनु. २-१२.
**यदा यदेह धर्मस्य क्षयो वृद्धिश्च पाप्मनः ।**
**तदा तु भगवानीश आत्मानं सृजते हरिः ॥**—भाग.९-२४-५६.
**यं त्वार्याः क्रियमाणं प्रशंसन्ति स धर्मो यं गर्हन्ते सोऽधर्मः ॥**
—आपस्तं. ध. सू. १-७.

"*God builds His temple in the heart on the ruins of Churches and Religions.*" —*Emerson–Worship.*

"*God comes to see us without bell.*" *Old Proverb.*

**४७. परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥**

त्रायते अनेन इति **त्राणम्**—रक्षण. Protection. परितः त्राणम् **परित्राणम्**—संरक्षण. Preservation, protection. तस्मै **परित्राणाय**. साध्नोति इति **साधुः**—स्वधर्मानुरूप वागणारा; सद्गुणी किंवा पुण्यवान् मनुष्य. A person

discharging his own religious duties; virtuous or pious man. विशेषेण नाशः **विनाशः**, तस्मै **विनाशाय**—निर्मूलन किंवा नाश करण्यासाठीं. For destruction. दुष्टानि कृत्यानि येषां ते (ब. स.) **दुष्कृतः**—दुष्ट लोक. The wicked, evil-doers. तेषां दुष्कृताम्. धारयति-ते इति **धर्मः**, धर्मस्य संस्थापनं (ष. त.) **धर्मसंस्थापनम्**, धर्मसंस्थापनस्य अर्थः (ष. त.) **धर्मसंस्थापनार्थः**, तस्मै **धर्मसंस्थापनार्थाय**—धर्मविहित कर्तव्यमार्गाची स्थापना-मांडणी करण्यासाठीं. In order to establish, or lay out the way of religious duties. **संभवामि**—व. प्र. ए. pre. 1st. sing. of सं+भू—१ प. होणें; उत्पन्न होणें; जन्म घेणें. 1 P. to become; be born; take up an incarnation. **युगं**—कालखंड, जगाच्या आयुष्यमर्यादेचा विशिष्ट भाग. [ युगें चार आहेतः—कृत (सत्य), त्रेता, द्वापर व कलि. या प्रत्येकाचीं मानवी वर्षें अनुक्रमें १,७२८,०००; १,२९६,०००; ८६४,०००, आणि ४३२,००० असून, या चारही युगांमिळून ४,३२०,००० मानवी वर्षांचें एक **महायुग** होतें. युगांचीं वर्षें क्रमानें कमी कमी गणलेलीं असून त्या प्रमाणांत प्रत्येक युगांतील लोकांमध्यें शारिरिक व नैतिक ऱ्हासहि होत आलेला आढळतो, अशी सामान्य समजूत आहे. प्रारंभाचें **कृत** किंवा **सत्य युग** हें **सुवर्णयुग** व हल्लींचें **कलि** हें **लोहयुग** समजतात.] **युगं**—An age; a particular period of the world's life-time. [ There are four ages:—कृत (सत्य), त्रेता, द्वापर and कलि. The duration of each is said to be respectively. 1,728,000; 1,296,000; 864,000; and 432,000 years of men. The four ages together comprising 4,320,000 years of men make one महायुग. It is also supposed that the regularly descending length of the ages represents a corresponding physical and moral deterioration in the people who live during each age, Krita being called the 'Golden', and Kali or the present age the 'Iron' age.—Principal Apte's Practical *Sanskrit-English* Dictionary ]. **युगे युगे**—प्रतियुगं—प्रत्येक युगांत. During every age or period.

**अन्वयः**—साधूनां परित्राणाय, दुष्कृताम् विनाशाय, धर्मसंस्थापनार्थाय च (अहं देव-मनुष्यादि रूपेण) युगे युगे संभवामि।

**अर्थः**—सज्जनांचे संरक्षण, व दुष्टांचा नाश करून प्रत्येक युगांत धर्मस्थापना करावी, याच हेतूनें मी (देव-मनुष्यादि रूपानें) अवतार घेऊन प्रकट होत असतों. ८

For the protection of the righteous, for the destruction of the wicked, and for the establishment of Law and order, I am born (in the form of either God or man) from age to age. 8

अधर्मकारिणं हत्वा सद्धर्मं पालयाम्यहम् ।
दुहिता भगिनी भ्रातुर्भार्या चैव तथा स्नुषा ॥-किष्किंधा.२-६०
धर्मसंरक्षणार्थैव प्रवृत्तिर्भुवि शार्ङ्गिणः ।—रघु. १५-४.
पुरा मयाकारि गिरींद्रपुत्र्याः प्रतिग्रहोऽयं नियतात्मनाऽपि
तत्रैष हेतुः खलु तद्भवेन वीरेण यद्वध्यत एव शत्रुः ॥
—कुमा. १२-५५.

शिवाय लोकस्य भवाय भूतये य उत्तमश्लोकपरायणा जनाः ॥
जीवन्ति नात्मार्थमसौ पराश्रयं मुमोच निर्विद्य कुतः कलेवरम् ॥
-भाग. १-४-१२.

भावयत्येष सत्त्वेन लोकान्वै लोकभावनः ।
लीलावतारानुरतो देवतिर्यङ्नरादिषु ॥ -भाग. १-२-३४
एतावानव्ययो धर्मः पुण्यश्लोकैरुपासितः ।
यो भूतशोकहर्षाभ्यामात्मा शोचति हृष्यति ॥-भाग ६-१०-९.

*For the spoiling of the poor, for the sighing of the needy,*
*Now will I arise, saith The Lord;*
*I will set him in safety at whom they puff."*
—*The Psalms, 12-5.*

४८. ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः॥ ११ ॥

ये—(संबं. सर्व., पु. प्र. अ. Nom. pl. of mas. rel. *pro.* यद् ) जे लोक. Who. यथा—अ. जसें, ज्याप्रमाणें. *ind.* As, like, accordingly, as much as. प्रकर्षेण पद्यन्ते इति प्रपद्यन्ते—( व. तृ. अ. pre. 3rd. pl. of प्र+पद् ४ आ. ) भजतात; पोहोंचतात. Worship; approach, attain. भजामि—( व. प्र. ए. pre. 1st. sing. of भज्—१ उ. ) मी वागवतों, देतों, प्रेम करितों, मानतों. I entertain, welcome, allot, grant, be kind to. वर्त्म—( वर्त्मन् ) मार्ग, पंथ. Path, way, system. अनुवर्तन्ते—व. तृ. अ. pre. 3rd. pl. of अनु+वृत्—१ आ. ( कधीं प. ) मागून जाणें, अनुसरणें. 1 A. ( sometimes P. ) to go after, follow, act according to. मनोः अपत्यं पुमान् मानवः-मनुष्यः—माणूस, पुरुष; मनुष्यप्राणी. A man; human being. पृथायाः अपत्यं पुमान् पार्थः—पृथेचा मुलगा अर्जुन. Arjuna, the son of Prithâ. सर्वशः—अ. सर्वप्रकारें, सर्वथैव. *ind.* Wholly, entirely.

**अन्वयः**—(हे) पार्थ, ये (मानवाः) माम् यथा प्रपद्यन्ते तान् तथा एव अहं भजामि। मनुष्याः सर्वशः मम वर्त्म (एव) अनुवर्तन्ते।

**अर्थः**—अरे अर्जुना, लोक मला ज्या भावनेनें (प्रकारें) भजतात, त्यांना मीसुद्धां तसेंच फळ देतों. कारण, मनुष्यें (मग तीं कोणत्याहि मार्गानें गेलीं तरी तीं) शेवटीं सर्वथैव माझाच मार्ग अनुसरतात–मलाच येऊन मिळतात. ११

In whatever manner men worship me, in the same manner do I welcome them; for whatever path men follow, O Arjuna, is entirely Mine-that path leads to Me. 11

'शठं प्रति शाठ्यं—जशास तसें–Tit for tat"

**यादृशी भावना यत्र सिद्धिर्भवति तादृशी ॥**

"*I will give unto everyone of you according to your works.*"

—*Revelation ii. 23.*

"*If God be glorified in him, God shall also glorify him in Himself.*" —*John-Ch. xiii. 32.*

"*Who will not mercy unto others show, how can he mercy even hope to have?*" —*Spenser.*

"*The Gods hearken to him who hearkens to them.*" —*Homer.*

**४९. कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

**कर्मणः**—ष. ए. Gen. sing. of **कर्मन्**—शास्त्रविहित कृत्य. Righteous duty. बोधितुं योग्यं इति **बोद्धव्यम्**—(विध्य. धा. सा. *Pot.* p. of. बुध्–१ उ., ४ आ. 1 U. 4 A.) विचार करावा, जाणावें. Should be discriminated-understood. विशेषेण गतं शास्त्रविहितात्, विपरीतं कर्म वा इति **विकर्मन्**—वाईट कृत्य, अप्रशस्त कर्म. Evil deeds, not pre-eminent; an impious act. न कर्म इति **अकर्मन्** (न. स.)–कर्म न करणें. Inaction. **गहना**—वि. कठीण, खोल; दुर्गम. *a.* Difficult, hard, mysterious; impassable. **गतिः**—मार्ग; परिणाम; उपाय. Path; consequence; alternative.

**अन्वयः**—कर्मणः (तत्त्वं) बोद्धव्यं, च विकर्मणः (तत्त्वं) बोद्धव्यं, च अकर्मणः अपि (तत्त्वं) बोद्धव्यम्। हि **कर्मणः गतिः गहना** (अस्ति)।

**अर्थः**—शास्त्रविहित कार्याचा विचार करावाच, पण शास्त्रनिषिद्ध कर्म कोणतें व अकर्म (कर्म करूनहि त्याची फलाशा करावयाची नसल्यानें तें न केल्याप्रमाणेंच

मानावयाचें ) म्हणजे काय याचाहि विचार अवश्य करावा. कारण, **कर्माचें तत्त्व फार खोल आहे**–कर्माच्या योग्य मार्गाचें ज्ञान होणें कठीण आहे. १७

One should necessarily know, by discrimination, the nature of actions ( ordained by the scriptures ). Also he has to understand what is evil action, and the inaction ( the action, of which fruit or reward is not desired though it is practically done ). Because, *mysterious is the path of Action.*—It is very difficult to know the proper ways and means of the Action. 17

**अज्ञात्वा भगवान्कस्य कर्माकर्मविकर्मकम् ।**
**दर्शनं याति हि मुने कुतो मुक्तिश्च तद्विना ॥** –मध्वभाष्ये.

*" The world is a wood, in which all lose their way,*
*Though by a different path each go astray. "*

*—Duke of Buckingham.*

*" The thousand paths that slope the way to crime. " —Byron.*

[**अकर्म** म्हणजे **कर्मसंन्यास** असा अर्थ पुढील श्लोकांत उद्दिष्ट आहे. कर्म करून त्यांच्या फलाची अपेक्षा न करितां ईश्वरार्पण करणें म्हणजेच **कर्मसंन्यास** अथवा **अकर्म** करणें होय. ' कर्मांत अकर्म व अकर्मांत कर्म ' पाहणें म्हणजे कर्म करूनहि त्यापासून अलिप्त राहणें, व फलापेक्षेपासून अलिप्त राहूनहि **लोकसंग्रहास्तव कर्म** करणें होय. The renunciation of action is called Inaction, and the same sense is implied in the following verse. To perform the duty for offering it to God, without hoping its fruit, is the Inaction or the Renunciation of Action. ' To see inaction in action and action in inaction' means to remain aloof from the fruit of action done to the welfare of the world ( लोकसंग्रह ). ]

५०. **कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥**

**कर्मणि**—सप्त. ए. loc. sing. of **कर्मन्**—कर्तव्यकर्म, विहितकार्य. Duty, righteous action or work. **अकर्मन्**—लोकसंग्रहास्तव कर्म करूनहि स्वतःच्या बाबतींत त्याची फलाशा न करणें–करून न केल्याप्रमाणेंच मानणें. The duty performed for the public betterment, without desiring its fruit or reward for the self *i. e.* to regard the Action as Inaction **पश्येत्**–

पश्येत्. तृ. ए. *pot.* 3rd sing. of दृश्—(पश्य)-१ प. पाहणें, जाणणें. 1 P. to see, know. बुद्धिः अस्य अस्ति सः **बुद्धिमान्**—ज्ञानी, शहाणा. The wise. **युक्तः**—कर्मयोगी; कर्तव्यांत मग्न किंवा व्यग्र असलेला. Engaged in, or devoted to a duty. **कृत्स्नम्**—वि. सर्व, संपूर्ण. *a.* All, the whole. कृत्स्नं च तत् कर्म कृत्स्नकर्म (क. धा.); कृत्स्नं कर्म करोति सः **कृत्स्नकर्मकृत** (उप. त. स.)—सर्व कर्में करणारा. Doing or performing all actions or duties.

**अन्वयः**—यः कर्मणि अकर्म, यः च अकर्मणि कर्म पश्येत् सः (नरः) मनुष्येषु **बुद्धिमान्** (अस्ति)। सः (एव) युक्तः, सः च कृत्स्नकर्मकृत् (गण्यते)।

**अर्थः**—जो मनुष्य **कर्तव्यकर्म** करून त्या **कर्माकडे अकर्माच्या** दृष्टीनें (फलाची अपेक्षा न ठेवितां, जणूं कांहीं आपण केलेंच नाहीं या भावनेनें) पाहतो, व अकर्माच्या ठायींच कर्म आहे असें जाणतो, तोच खरा **बुद्धिमान्**, तोच कर्मयोगी, व यथासांग सर्व कर्में पार पाडणाराहि तोच. १८

He who regards the action (though practically done, but being free from attachment to its fruit) as inaction, and sees action in inaction, is the really wise among men; he is the true ascetic (engaged in his duties), and he alone has accomplished all his work. 18

**अथाग्रे ऋषयः कर्माणीहन्तेऽकर्महेतवे ।**
**ईहमानो हि पुरुषः प्रायोऽपीहां प्रपद्यते ॥** –भाग. ८–१–१४.

**निवृत्तिरपि मूढस्य प्रवृत्तिरुपजायते ।**
**प्रवृत्तिरपि धीरस्य निवृत्तिफलभागिनी ॥** –अष्टावक्रगीता १८–६१.

"*Man is of Soul and Body, formed for deeds of high resolve.*"
—*Shelley.*

"*He only is a well-made man who has a good determination.*"
—*Emerson.*

"*Ful wise is he that can himselven knowe.*" —*Chaucer.*

**५१. यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥**

सम्यक् आरभ्यते इति **समारंभः**—कर्तव्यकर्म; सत्कार्य. Action, duty; noble work. काम्यते इति **कामः**—इच्छा फळ. Desire; fruit. सम्यक् कल्पते अनेन इति **संकल्पः**—हेतु, मनोव्यापार, अंतःकरण; 'मी कर्ता' अशी

अहंभावना. Object, purpose, intention at heart; a thought of arrogance that 'I am the doer'. **वर्जितः**—( भू. धा. p. p. of **वृज्**—१ प., २ आ., ७ प., १० उ. टाकणें, चुकविणें, वर्जणें. 1 P. 2 A. 7 P. 10 U. To avoid, shun, exclude. ) वगळलेला, विरहित. Destitute of, without. कामस्य संकल्पः ( ष. त. ), कामश्च संकल्पश्च **कामसंकल्पौ** (द्वं. स.), कामसंकल्पाभ्यां वर्जितः ( तृ. त. स. ) **कामसंकल्पवर्जितः**—फलेच्छारहित. Free from the desire. ज्ञानं अग्निः इव, ज्ञानं एव अग्निः वा ( क. स. ), **ज्ञानाग्निः**—ज्ञानरूप अग्नि. Fire in the form of wisdom. ज्ञानाग्निना दग्धानि कर्माणि यस्य सः ( ष. ब. स. ) **ज्ञानाग्निदग्धकर्मा**—ज्ञानरूप अग्नीनें ज्याचीं कर्मबंधनें नष्ट झालीं आहेत तो. He whose bonds of actions are burnt up by the fire of Wisdom. **आहुः**—व. तृ. अ. pre. 3rd. pl. of **ब्रू**—२ उ. किंवा **अह्**—बोलणें, म्हणणें. To speak, say. **अह्**—हा अनियमित धातु असून त्याचीं पुढें दिलेलीं पांच रूपेंच फक्त प्रसिद्ध आहेत. कोणी हीं पांचही रूपें ब्रू धातुला जोडितात. हे दोन्ही धातु द्विकर्मक आहेत. The verb अह् is a defective one of which the following five forms only are known. Some attribute these forms to the verb **ब्रू**—**आत्थ** द्वि. पु. ए., **आहथुः** द्वि. पु. द्वि., **आह** तृ. पु. ए., **आहतुः** तृ. पु. द्वि, **आहुः** तृ. पु. ब. These two verbs govern two accusatives. **पंडा**—( शास्त्रतात्पर्यवती बुद्धिः-**बालबोधिनी**; ब्रह्माकारा अंतःकरणवृत्तिः-**सान्वबोधिनी**. ) बुद्धि; ज्ञान. Wisdom; learning. पंडा अस्य अस्ति, पंडा संजाता यस्य वा सः **पण्डितः**—शहाणा, जाणता. The wise, the learned. बोधन्ति इति ते **बुधाः**—शहाणे, बुद्धिमान्. The wise.

**अन्वयः**—यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ( सन्ति ) तम् ज्ञानाग्निदग्धकर्माणं बुधाः पण्डितं आहुः ।

**अर्थः**—ज्याचे सर्व व्यवहार (उद्योग) कर्मफलाची अपेक्षा न धरितां निःस्वार्थबुद्धीनें केलेले असतात, व ज्ञानरूप अग्नीनें ज्याचीं कर्मबंधनें भस्मसात् झालेलीं असतात, अशा मनुष्यालाच शहाणे लोक **पंडित** असें समजतात. १९

He whose activities are all devoid of desire ( for their fruit ), and whose selfish bonds of actions are burnt up by the fire of knowledge, him alone the learned men call *the wise*. 19

**तत्त्वज्ञः सर्वभूतानां योगज्ञः सर्वकर्मणाम् ।**
**उपायज्ञो मनुष्याणां नरः पण्डित उच्यते** ॥-म. भा.-उद्योगपर्व.
**इतरो दहने स्वकर्मणां ववृते ज्ञानमयेन वह्निना** ॥—रघु. ८-२०.

*"'Tis hard to be in love and to be wise."* —*Nathe. Lee.*

*" He never errs who sacrifices self."* —*Bulwer Lytton.*

*" He only is a great man who can neglect the applause of the multitude, and enjoy himself independent of its favour."*—*Sir Steele.*

**५१. श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥**

अतिशयेन प्रशस्तः इति **श्रेयान्**—अधिक चांगला. Better. द्रव्यं प्राचुर्येण वर्तते यस्मिन् सः **द्रव्यमयः**—द्रव्यप्रचुरः द्रव्यविकारः वा-**यज्ञः**—ज्यांत द्रव्यच अधिक लागतें असा यज्ञ. A sacrifice full of materials. **मय**—हा नामाला जोडणारा प्रत्यय असून याचा अर्थ 'चा बनविलेला'; 'नें पूर्ण', असा होतो. This is an affix used to indicate 'made of', 'full of'. **यज्ञः**—होमहवन; त्याग; बळी देणें. Any. offering or oblation to the fire; renunciation; sacrifice. ज्ञानात्मकः, ज्ञानेन, ज्ञानं एव यज्ञः वा इति **ज्ञानयज्ञः**—ज्ञानदान; ज्ञानरूपी यज्ञ. A sacrifice performed by imparting spiritual knowledge. परं (शत्रु) तापयति इति **परंतपः** (उ. त. स.)—शत्रूला ताप देणारा-जिंकणारा-अर्जुन. Arjuna, the subduer of his enemies. नास्ति खिलं (अवशिष्टं) यस्य तत् **अखिलं**—सर्व, संपूर्ण. The whole. परितः (अभितः) समाप्यते इति **परिसमाप्यते**—कर्म. वर्त. तृ. ए. *pass.* pre. 3rd sing. of **परि + सम् + आप्**-५ आ. अंतर्भाव-शेवट-पर्यवसान होणें. 5 A. To be finished-comprehended -culminated.

**अन्वयः**—परंतप, द्रव्यमयात् यज्ञात् ज्ञानयज्ञः श्रेयान् (अस्ति)। पार्थ, सर्वं अखिलं कर्म ज्ञाने (एव) परिसमाप्यते ।

**अर्थः**—अरे रिपुदमन करणाऱ्या **अर्जुना**! द्रव्ययुक्त यज्ञापेक्षां ज्ञानयुक्त यज्ञच अधिक श्रेष्ठ आहे. कारण, **पार्था**! यच्चयावत् सर्व (यज्ञरूप) कर्मांचा अंतर्भाव ज्ञानामध्येंच होतो. ३३

O Arjuna, the terror of enemies! the sacrifice of knowledge is far superior to that of any other object or materials. For, O son of Prithâ, all actions (performed by way of sacrifice) are comprehended in knowledge only. 33

**आकिंचन्ये न मोक्षोऽस्ति किंचन्ये नास्ति बन्धनम् ।**
**किंचन्ये चेतरे चैव जन्तुर्ज्ञानेन मुच्यते ॥** –म. भा. शांति. ३२०-५०.

" *Wisdom is better than rubies.*" —*Old Testament.*

" *The seeds of knowledge may be planted in solitude, but must be cultivated in public.*" —*Johnson.*

[ गुरूंपासून ज्ञान कसें संपादन करावें ? *How to acquire knowledge from Gurus or preceptors ?* ]

**५३. तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥**

**विद्धि**—(आज्ञा. द्वि. ए. *Impera.* 2nd sing. of विद्–जाणणें. To know) तूं जाण. Do understand. नीचैः पातः **निपातः**, प्रकर्षेण निपातः **प्रणिपातः**—वंदन, नमस्कार. Reverential bow, salutation. परितः प्रश्नः ( कतरकतमौ जाति–परिप्रश्ने–**पाणिनी.** ) **परिप्रश्नः**—विचारणें, प्रश्न करणें. Questioning, inquiry. सेव्यते अनया इति **सेवा**—दास्य, चाकरी. The service. **उपदेक्ष्यन्ति**—भवि. तृ. ब. *Fut.* 3rd pl. of **उप + दिश्**—६ उ. शिकविणें, मार्ग सांगणें. 6 U. to instruct, advise. तत्त्वं दृश्यते यैः, तत्त्वस्य दर्शनं ( साक्षात्कारः ) येषां वा ते ( **ब. स.** ) **तत्त्वदर्शिनः**—सत्यार्थ जाणणारे, ब्रह्मज्ञानी, तत्त्वज्ञानी. Those who know the truth or the Supreme Being; a philosopher, the seer of the essence of things.

**अन्वयः**—प्रणिपातेन, परिप्रश्नेन, सेवया ( च ) तत् (ज्ञानं) विद्धि । तत्त्वदर्शिनः ज्ञानिनः ते ज्ञानं उपदेक्ष्यन्ति ।

**अर्थः**—लीन होऊन वंदन करणें, प्रश्न विचारणें आणि सेवा बजावणें या तीन प्रकारांनीं तूं तें ज्ञान संपादन करून घे. तत्त्वज्ञानी ( ज्ञाते ) पुरुष तुला–अंगीं लीनता आलेल्या शिष्याला–त्या ज्ञानाचा उपदेश करतील. ३४

Learn this by humble reverence, by questioning and by serving ( your preceptor ). The wise and the seers of the essence ( of things ) will instruct a humble disciple like you in knowledge. 34.

**यो हि नो कुरुते पापं सर्वभूतेषु कर्हिचित् ।**
**कर्मणा मनसा वाचा स ज्ञानी कथ्यते बुधैः** ॥–प्रमाणसहस्री ११३२.

" *The world cannot show us a more exalted character, than that of a truly religious philosopher, who delights to turn all things to the glory of God; who, in the objects of his sight, derives improvement to*

*his mind; and in the glass of things temporal, sees the image of things spiritual."* *—Jones of Nayland.*

*" Head-knowledge is our own, and can polish only the outside; heart-knowledge is the spirit's work, and makes all glorious within."* *—Adam.*

**५४. न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति ॥ ३८ ॥**

**सदृशं**—सारखें. Similar, like. **इह**—येथें; या जगांत. Here; in this world. **विद्यते**—( विद्-४ आ. असणें. To be) आहे, असतें. There is, exists. सम्यक् सिद्धः **संसिद्धः**—पूर्णतेस पोहोंचलेला. Fully accomplished or perfected. [ **योगः**—कर्मयोगः समाधियोगः च-**शांकरभाष्ये**; ज्ञानाकार कर्मयोगः-**रामानुजभाष्ये**; कर्मयोगादि सम्यक् प्रकारः—फलानाभिलाषेण कृतकर्मयोगः—**अमृततरंगिणी टीका**; निष्कामकर्मानुष्ठानम्-**नीलकंठी टीका**. ] **योगः**—कर्मयोग, निष्काम बुद्धीनें केलेलें लोकसंग्राहक कार्य. Harmony in, or union with action, any righteous duty performed selflessly for the welfare of people. योगेन संसिद्धः ( तृ. त. ) **योगसंसिद्धः**—कर्मयोगी. Performer of, or harmonious with righteous duties; one who is perfected in *yoga* of action. **कालेन**—योग्य वेळीं, कांहीं-योग्य काळानंतर; दीर्घ प्रयत्नानें. In due course, after some or in proper time; by continued efforts. **आत्मनि**—सप्त. ए. loc. sing. of **आत्मन्**—स्वतः, आपण; आत्मा. The self, oneself; the soul. **विद्**—४ आ. असणें; ( विन्द् ) ६ उ. मिळविणें. 4 A. to be, exist; 6 U. to obtain, acquire.

**अन्वयः**—हि इह ज्ञानेन सदृशं पवित्रं ( किमपि ) न विद्यते । योगसंसिद्धः स्वयं तत् ( ज्ञानं ) कालेन ( चिरप्रयत्नेन ) आत्मनि विंदति ।

**अर्थः**—खरोखर, या जगांत **ज्ञानासारखें पवित्र असें दुसरें कांहीं नाहीं**. कर्मयोगी सिद्ध पुरुषाला तें ज्ञान कांहीं काळानें ( दीर्घ प्रयत्न करून ) आपल्या ठिकाणीं प्राप्त करून घेतां येतें. ३८

Surely, there is nothing so purifying in this world as ( divine ) knowledge. A man who is perfectly accomplished in *yoga* of action finds it in himself, in due season ( by continued efforts). 38

**अद्भिर्गात्राणि शुद्ध्यन्ति मनः सत्येन शुद्ध्यति।**
**विद्यातपोभ्यां भूतात्मा बुद्धिर्ज्ञानेन शुद्ध्यति ॥** -मनु. ५-१०९.

**जपस्तीर्थं तपो दानं पवित्राणीतराणि च।**
**नालं कुर्वन्ति तां सिद्धिं याऽज्ञानकलया कृता॥**-भाग.११.१९-४.

" *Wisdom is the principal thing; therefore, get wisdom; and with all thy getting get understanding.*" —*Proverbs.*

" *And one man that has a higher wisdom is stronger than all men that have it not.*" —*Carlyle.*

" *Knowledge is power.*" —*Bacon.*

**५५. श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति॥ ३९॥**

श्रद्धा ( भक्ति, faith ) अस्य अस्ति इति **श्रद्धावान्**—भक्तिपूर्वक मानणारा, विश्वास ठेवणारा. One who is intent upon faith, or believes faithfully. **लभते**—व. तृ. ए. *pre.* 3rd. sing of **लभ्—१** आ. मिळविणें. 1 A. to get, obtain. तत् एव परं यस्य सः **तत्परः**—त्याच्याच मागें लागलेला, तल्लीन. Closely intent upon it. संयतानि ( विषयेभ्यः निवर्तितानि ) इंद्रियाणि यस्य ( ष. ब. स. ) सः **संयतेंद्रियः**—ज्यानें आपलीं इंद्रियें ताब्यांत ठेविलीं आहेत तो. One who has complete control over his senses. **संयत—भू.** धा· वि. *p. p.* of यम्—१ प. ताब्यांत ठेवणें. 1 P. to check, subdue. **लब्ध्वा**—( धा. अ. *ger.* of लभ् ) संपादून. Having obtained. **चिरं**-वि. फार वेळ. *a.* A long time. न चिरेण इति **अचिरेण**—क्रि. वि. तावडतोब. *adv.* Quickly. **अधिगच्छति**—( अधि + गम्-गच्छ ) संपादितो. Secures.

**अन्वयः**—श्रद्धावान्, तत्परः ( तत्=ज्ञानम् ), संयतेंद्रियः ( च ) ज्ञानं लभते। ज्ञानं लब्ध्वा ( सः ) परां शांतिं अचिरेण अधिगच्छति ।

**अर्थः**—ज्याच्या ठिकाणीं पूर्ण श्रद्धा वास करिते, ज्ञानप्राप्तीविषयीं जो खरोखर उत्सुक झाला आहे, व ज्यानें आपल्या इंद्रियांवर पूर्ण ताबा ठेविला आहे अशा मनुष्यालाच तें ज्ञान प्राप्त होतें. व एकदां हें ज्ञान मिळविल्यावर लौकरच त्याला दिव्य शांतिसुखाचा लाभ होतो. ३९

**The man who is full of faith, whose mind is closely intent upon ( knowledge ), and also who has complete control over his senses, obtains (divine) knowledge; and having once obtained this knowledge, he soon reaches the Supreme Peace. 39**

**श्रद्दधानाय भक्ताय विनीतायानसूयवे ।**
**भूतेषु कृतमैत्राय शुश्रूषाभिरताय च ॥** —भाग ३-३२-४१.

*"At the bottom of the faith-sea lies the pearl of knowledge; happy the diver that finds it."* —*Bodenstedt.*

*"The deep religion of a thoughtful heart,*
*Which rests instinctively in Heaven's law*
*With a full Peace, that never can depart*
*From its own steadfastness."* —*Lowell.*

**५३. अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥**

जानाति इति ज्ञः, न ज्ञः **अज्ञः**—ज्ञानहीन. The ignorant. श्रद्दधाति इति श्रद्दधानः, न श्रद्दधानः **अश्रद्दधानः**—श्रद्धा-भक्तिहीन. Faithless. संशयः विद्यते आत्मनि यस्य ( ब. स.) सः **संशयात्मा**—संशयी मनाचा मनुष्य. The doubting self, sceptic. **विनश्यति**—व. तृ. ए. *pre.* 3rd sing. of वि + **नश्**—४ प. नाश पावणें, नष्ट होणें. 4 P. to be destroyed; perish, die. **अयं लोकः**—हें जग, मृत्युलोक. This world, the terrestrial world. **परः** ( लोकः )—श्रेष्ठ-स्वर्ग लोक. The Heaven.

**अन्वयः**—अज्ञः च अश्रद्दधानः च संशयात्मा च विनश्यति । संशयात्मनः न अयं लोकः, न परः लोकः न सुखं च अस्ति ।

**अर्थः**—अज्ञानी, श्रद्धाविहीन व संशयी मनुष्याचा सर्वस्वी नाश होतो. संशयी मनुष्याला हा मृत्युलोक उपभोगितां येत नाहीं, मग परलोक कोठचा ? अर्थात् त्याला सुखहि अनुभविण्यास मिळत नाहीं. ४०

The ignorant, faithless and doubting man is bound to perish. The sceptic fellow cannot enjoy even this terrestrial world, much less the Heaven ! And so, he finds no happiness whatsoever. 40

**अश्रद्धा परमं पापं श्रद्धा पापप्रमोचनी ।**
**जहाति पापं श्रद्धावान्सर्पो जीर्णामिव त्वचम् ॥**-भार. शां.१६४-१५.

*"When you are in doubt abstain."* —*Zoraster.*
*"A doubtful throne is ice on summer seas."* —*Tennyson.*

*"Our lives are universally shortened by our ignorance."*
—*H Spenser.*

*"Suspicion always haunts the guilty mind;*
*The thief doth fear each bush an officer."* —*Shakespeare.*

*Jesus said unto him, "O thou of little faith! wherefore didst thou doubt?"* —*Matthew-Ch. xiv.*

---

# अध्याय पांचवा

सर्व कर्में लोकहितार्थ करून तीं ईश्वरार्पण करणें, व ज्ञानोत्तर कर्माविषयीं स्वार्थी भावना सोडून देणे, यास **संन्यास** असें म्हणतात. चौथ्या अध्यायांत याच ज्ञानोत्तर कर्मसंन्यासाविषयीं विवेचन केलें. तथापि **संन्यासधर्मा**विषयीं विशेष विवेचन या भागांत केलें असल्यानें याला **संन्यास-योग** म्हटलें आहे. कर्म-योगांत निष्काम कर्माचा भाग जास्त येतो; किंबहुना, आपपरभाव मनांत न वागवितां, सर्वत्र सर्वकालीं निष्कामकर्में करीत राहणें यासच **कर्मयोग** म्हणतां येईल. **संन्यास** व **कर्मयोग** हे शब्द अर्थतःच भिन्न आहेत, व त्यामुळेंच व्यवहारांतील **संन्यासी** फार तर आत्मोन्नतिच करूं शकतो, पण **गीतेंतील कर्मयोगी** आत्मोन्नति करूनहि **लोकसंग्रहार्थ** झटत असतो. नुसत्या **कर्म-संन्यास** शब्दानें, **ज्ञानोत्तर कर्में करण्याचेंच सोडून देणें**, असा अर्थ होतो. म्हणून **कर्मसंन्यास**-कर्में न करण्याचें ध्येय-सोडून देऊन **कर्मयोग** म्हणजे निरपेक्ष कर्मसातत्य राखणें हेंच सर्वथैव योग्य आणि आवश्यक आहे.

**५७. संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ॥**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥**

सन्यस्यति अस्मिन् इति **संन्यासः**—प्रापंचिक बंधनांपासून दूर रहाण्याची स्थिति. The state of living in which one resigns his worldly affairs and attachments. Also कर्मणां सम्यक् न्यासः अस्मिन् इति **संन्यासः**—कर्मणां योगः (ष. त.) **कर्मयोगः**—कर्तव्य बजावणें. Performance of duties-worldy as well as religious. निश्चयेन श्रेयः निःश्रेयः, निःश्रेयः करोति इति **निःश्रेयसकरः**—खात्रीनें शुभ-कल्याणकारक, मोक्षदायक. Surely auspicious, or leading to final bliss. **उभौ**—प्र. द्वि. nom. dual of **उभ—दोघे.**

Both. हें सर्वनाम नेहमीं द्विवचनींच उपयोगिनात. This *pron.* is always used in the dual. तु—अ. परंतु. *ind.* But. कर्मणां संन्यासः (ष. स.) **कर्मसंन्यासः**—कर्मत्याग. Renunciation of action-duty. **विशिष्यते**—कर्म. व. तृ. ए. *pass. pre.* 3rd. sing of वि + शिष्—७ प.-पेक्षां-अधिक चांगलें असणें; विशेष निराळा-अधिक मानणें; व्याख्या करणें. 7 P. to be better or higher than; to particularize, specify; define.

**अन्वयः**—संन्यासः कर्मयोगः च उभौ निःश्रेयसकरौ ( स्तः ) । तु तयोः कर्मसंन्यासात् कर्मयोगः विशिष्यते ।

**अर्थः**—कर्मत्याग व कर्मानुष्ठान हीं दोन्हींहि कल्याणकारक आहेत; परंतु या दोहोंत कर्मत्यागापेक्षां कर्माचें अनुष्ठान हें अधिक श्रेष्ठ होय. २

The renunciation of duties and their selfless performance both lead to the final bliss. But of the two, the performance of duties is surely better than their renunciation. 2

**द्वंद्वत्यागात्तु संन्यासान्मत्पूजैव गरीयसी ।**
**संन्यासे तु तुरीये वै प्रीतिर्मम महीयसी ।**
**येषामत्राधिकारो न तेषां कर्मेति निश्चयः ॥** —ब्राह्मे. १३०
**क्रियायोगो वियोगश्चाप्युभौ मोक्षस्य साधने ।**
**तयोर्मध्ये क्रियायोगस्त्यागात्तस्य विशिष्यते ॥** –गणेशगी. ४

*"Renunciation remains sorrow, though a sorrow borne willingly."*
—*George Eliot.*

*"Our works are the mirror wherein the spirit first sees its natural lineaments."* —*Carlyle.*

*"It is equally a mistake to place inactivity above action, for happiness is activity, and the actions of the just and wise are the realization of much that is noble."* —*Aristotle's Politics, Vol. I. p. 212.*

**५८. योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ॥**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥**

भगवदर्पणं फलाभिसंधिरहितयादि गुणयुक्तं शास्त्रविहितं कर्म इति **योगः** उच्यते—**कृष्णमोहनशर्मा कार्तांतिकः**; योगेन-कर्मानुष्ठानेन-युक्तः इति **योगयुक्तः**—**बालबोधिनी टीका**—पाठकशास्त्रिणः; निष्कामतया ईश्वरार्पणबुध्या अनुष्ठीयमानं **कर्म**

**योगः**—ब्रह्मानंदगिरी व्याख्या. योगेन युक्तः ( ३. त. स. ) **योगयुक्तः**—कर्मयोगी Harmonious with duties. विशेषेण शुद्धः आत्मा यस्य सः ( ष. ब. स. ) **विशुद्धात्मा**—शुद्धांतःकरणी. Pure-minded. विशेषेण जितः आत्मा यस्य ( ब. स. ) सः **विजितात्मा**—ज्याचें मन स्वतःच्या ताब्यांत आहे तो. He who has control over his mind; self-ruled. जितानि इंद्रियाणि यस्य येन वा ( ब. स. ) सः **विजितेंद्रियः**—इंद्रियें ज्यानें ताब्यांत ठेविलीं आहेत तो. One who subdued his senses. सर्वेषां भूतानां आत्मभूतः आत्मा यस्य सः ( ष. ब. स. ), अथवा सर्वभूतात्मरूपः—भगवान्, सः एव आत्मा-स्वरूपं-यस्य सः **सर्वभूतात्मभूतात्मा**—सर्व प्राणीमात्रांचा आत्मा तोच आपला आत्मा, असें जो मानितो तो. One who regards, or counts the self of all beings as his own. करोति इति **कुर्वन्**—( व. धा. *pre. p.* of कृ. ८ उ. करणें. To do ). करणारा; करीत असून. Doer; acting, doing. **लिप्यते**—( कर्म. व. तृ. ए. *pass. pre.* 3rd. sing. of **लिप्**—६ उ. लागणें, बिघडविणें. To stain, pollute, taint )—बांधला जातो, बिघडतो. Is affected, defiled.

**अन्वयः**—योगयुक्तः, विशुद्धात्मा, विजितात्मा, जितेंद्रियः, सर्वभूतात्मभूतात्मा ( च कर्म ) कुर्वत् अपि ( पापपुण्यादिबंधनैः ) न लिप्यते ।

**अर्थः**—जो स्वतः कर्मयोगी, शुद्धचित्त, मनोविजयी व इंद्रियविजयी असून, सर्व प्राणीमात्रांचा व स्वतःचा आत्मा एकच आहे असें मानितो तो, स्वतःचीं कर्तव्य-कर्मे करीत असला तरी ( त्यांच्या पाप-पुण्यादि बंधनापासून ) अलिप्तच असतो. ७

He who is harmonious with his selfless duties and pure in soul, who has conquered himself and mastered his senses, and whose Self is the Self of all beings, he is ever unaffected though acting,-he is free from all the ties of merits and demerits of the deeds he has been doing. 7

**श्रुत्वा स्पृष्ट्वा च दृष्ट्वा च भुक्त्वा घ्रात्वा च यो नरः ।**
**न हृष्यति ग्लायति वा स विज्ञेयो जितेंद्रियः ॥**—मनु. २-९८
**आत्मा शुद्धः स्वयंज्योतिरविकारी निराकृतिः ।**
**यावद्देहेंद्रियप्राणैर्भिन्नत्वं नात्मनो विदुः ॥**
**तावत्संसारदुःखौघैः पीड्यन्ते मृत्युसंयुताः ।**
**तस्मात्त्वं सर्वदा भिन्नमात्मानं हृदि भावय ॥** अयो. ४. ३०।४०

*" Purity is the feminine, Truth is masculine, of Honour. "*

*—J. C. Hare.*

*" In vain he seeketh others to suppress,*
*Who hath not learned himself first to subdue."* —*Spenser.*
*" The Pure Soul*
*Shall mount on native wings, disdaining little sport,*
*And cut a path into the Heaven of Glory,*
*Leaving a track of light for men to wonder at."* —*Blake.*

**५९. नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ॥**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ॥ १५ ॥**

**आदत्ते**—व. तृ. ए. *pre.* 3rd. sing of आ+दा ३ आ. घेणें, स्वीकारणें. 3 A. to take, accept or receive. **चित्**—अ. थोडें, कांहीं. **किम्** हें सर्वनाम व त्यापासून होणाऱ्या रूपास हें अव्यय जोडिलें असतां अनियमित अर्थबोध होतो. *ind.* Little, some. This is a particle which, if added to *pron.* किम् and its derivations, imparts an indefinite sense to them, such as:—कश्चित्, काचित्, किंचित्, क्वचित्, कथंचित् इ०. पाति (रक्षति) अस्मात् आत्मानं इति **पापम्**—वाईट. Sin, evil doing. सुष्ठु कृतं **सुकृतम्**—पुण्य किंवा सत्कर्म. A virtuous or meritorious act, good work--service. विशेषेण भवति (व्यापकः) इति **विभुः**—परमेश्वर. The Omnipresent Lord. आसमंतात् वृतं इति **आवृतं**—( भू. धा. *p. p.* of आ+वृ—५, ९, १० उ.) आच्छादिलेलें, झांकलेलें. Covered, concealed. **तेन**—त्यामुळें. Therefore. **मुह्यन्ति**—व. तृ. ब. *pre.* 3rd. pl. of मुह्—४ प. मोह पावणें, भुरळ पडणें. 4 P. To faint, delude, become senseless. **जंतवः**—( जंतुः )—प्राणी, जीव. Creatures, living beings.

**अन्वयः**—विभुः कस्यचित् पापं न आदत्ते, सुकृतं च न एव आदत्ते, ज्ञानं अज्ञानेन आवृतं अस्ति । तेन जन्तवः मुह्यन्ति ।

**अर्थः**—परमेश्वर कोणाचे वाईट कृत्य स्वीकारीत नाहीं, तसेंच कोणाचें पुण्यकर्महि घेत नाहीं; अज्ञानरूप पडद्यानें ज्ञान आच्छादिलेलें असल्यानें सर्व जीवजंतू मोह पावतात—त्यांना भुरळ पडते. १५

The Omnipresent Lord accepts neither the sin nor even the meritorious act of any. The knowledge is covered by ignorance, and therefore, the mortals are deluded. 15

**अहो नु चित्रा मायेयं तता विश्वविमोहिनी ॥**
**असत्यैवापि सद्रूपा मरुभूमिषु वारिवत् ॥**—योग.निर्वा.६३-७.

*" The tempter or the tempted, who sins most? Ha !*
*Not she; nor doth she tempt; but it is I."*
*—Shakespeare–Measure for measure II. II.*

*" He that voluntarily continues ignorance, is guilty of all the crimes which ignorance produces."* *—Dr. S. Johnson.*

**६०. विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ॥**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥**

वेत्ति आत्मानं अनया इति विद्या—आत्मज्ञान. Self-knowledge. विशेषेण नयः **विनयः**—नम्रता. Discipline, polite conduct. **संपन्नः**—युक्त Possessed of. विद्या च विनयश्च विद्याविनयौ ( द्वं. स. ), ताभ्यां विद्याविनयाभ्यां संपन्न ( तृ. स. ) **विद्याविनयसंपन्नः**—आत्मज्ञान आणि लीनता यांनीं युक्त. One endowed with, or possessed of self-knowledge and discipline. **गवि**—(सप्त. ए. Loc. sing. of **गौः**—गाय. A cow. ) गाईच्या ठायीं. In case of–as regards–a cow. **हस्तिन्**—हत्ती. An elephant. **शुनि**—(स. ए. Loc. sing. of श्वन् )—कुत्र्याच्या ठायीं. As regards a dog. स्वप्राणवृत्त्यै ' श्वानमपि पचति ' ( शिजवितो, खातो. Cooks, digests ) इति वा ' श्वः भवितव्यं इति पचति' (विकास-सिद्धि पावतो. Goes to perfection शंकरानंदी व्याख्या) इति वा **श्वपाकः**—चांडाळ, अतिशूद्र. An outcaste, the lowest class. समं दृष्टुं शीलं येषां ते (ष. ब. स. ) **समदर्शिनः**—निःपक्षपाती दृष्टीनें पाहणारे; उच्च–नीच किंवा आपपर भाव न मानणारे संत. Sages looking equally or impartially upon all beings.

**अन्वयः**—विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे च गवि, हस्तिनि, शुनि श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ( सन्ति ) ।

**अर्थः**—विद्या व विनय यांनीं संपन्न असा एकादा ब्राह्मण दिसो, किंवा गाय, हत्ती, कुत्रा, किंवहुना चांडाल भेटो, त्या सर्वांच्या ठिकाणीं ज्ञाते लोक निःपक्षपात दृष्टीनेंच–उच्चनीच भाव न ठेवितां समबुद्धीनेंच–वागतात. १८

The sages look impartially upon all–whether it may be a learned and disciplined Brahmin, or a cow or an elephant or a dog or even an outcaste. 18.

**निर्गुणेष्वपि सत्त्वषु दयां कुर्वन्ति साधवः ।**
**नहि संहरते ज्योत्स्नां चन्द्रश्चाण्डालवेश्मनि ॥** —पंचतंत्रे

*"The true standard of Equality is seated in the mind: those who think nobly are noble."* —*Bickerstaff.*

*"In the gates of Eternity, the black hand and the white hold each other with an equal clasp."* —*Mrs. Stowe.*

*"The man with most ability shall give most; the man with least ability shall receive most."* —*Sala.*

## ६१. लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषय क्षीणकल्मषाः ॥ छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥

**ब्रह्मन्**—ईश्वर, परमात्मा. The Lord, The Supreme Being. **निर्वाणम्**—मोक्ष सुख आनंद. Final emancipation or supreme bliss. ब्रह्मणि निर्वाणम् इति **ब्रह्मनिर्वाणम्** (स. त. स.)—मोक्ष. Salvation, Eternal Peace. **ऋषि**—तपस्वी, ज्ञानि. Practising penance; one possessed of true or spiritual knowledge. [ **ऋषि** गृहस्थाश्रमी असतो, **यति** बहुधा प्रथम गृहस्थाश्रमी बनून नंतर संसारत्याग करितो व **मुनि** कधींच गृहस्थाश्रमी न होतां आयुष्य ब्रह्मचर्यानें घालवितो. The Rishi gets married and performs household duties; a Yati generally gets married at first and afterwards resigns his household duties, and the Muni never gets married, but passes his life in celibacy. ] **क्षीणम्**—नष्ट. Destroyed. **कल्मषम्**—पातक. Sin. क्षीणं कल्मषं येषां ते ( ष. ब. स. ) **क्षीणकल्मषाः**—ज्यांचे पातकादि दोष नाहींसे झाले आहेत ते. Those whose sins are destroyed. **छिन्नं**—( भू. धा. वि. *p. p.* of छिद्-७ उ. कापणें, नाहींसें करणें, नाश करणें. 7 U. to cut, remove, destroy ) नष्ट. Destroyed. **द्वैधम्**—संशय; दुजाभाव. Doubt; duality. छिन्नं द्वैधं येषां ते ( ष. ब. स. ) **छिन्नद्वैधाः**—ज्यांचा द्वैतभाव नष्ट झाला आहे ते. They whose duality is no more. **यत**—( यम्-१ प. ) ताब्यांत असलेलें. Checked or restrained. यतः आत्मा यस्य सः ( ष. ब. स. ) **यतात्मा**—ज्याचें मन पूर्णपणें ताब्यांत आहे तो. He who has complete mastery over his mind. **रतः**—( भू. धा. वि. *p. p* of रम्-१ आ. रमणें, आनंद पावणें. 1 A. to rejoice, take delight in. ) प्रेमानें गढून गेलेला. fondly attached-delighted. सर्वाणि च तानि भूतानि **सर्वभूतानि** (क. धा.), सर्वभूतानां हितं **सर्वभूतहितं** ( ष. त. ):—सर्व प्राणिमात्रांचें कल्याण. Welfare of all beings.

**अन्वयः**—क्षीणाकल्मषाः, छिन्नद्वैधाः, यतात्मानः, सर्वभूतहिते रताः ऋषयः ब्रह्मनिर्वाणं लभंते ।

**अर्थः**—ज्यांचे पातकादि दोष नष्ट झाले आहेत, ज्यांच्या अंतःकरणांत संशयाला (द्वैतभावनेला) जागा नाहीं, ज्यांचीं मनें सर्वस्वीं ताब्यांत आहेत, व जे सर्व प्राणीमात्रांच्या कल्याणासाठीं झटत आहेत अशा ज्ञानी ऋषींनाच मोक्षपद प्राप्त होतें. २५

The sages whose sins are destroyed, whose doubts ( doctrines of dualism ) are removed, whose minds are mastered, and who take delight in the welfare of all beings, obtain the Eternal Bliss-Salvation. 25

**विपर्ययः संशयो वा यद्द्वैधं त्वकृतात्मनाम् ।**
**ज्ञानासिना तु तच्छित्त्वा मुक्तसंगः परिव्रजेत् ॥**
**क्षीणपापा महाज्ञाना जायन्ते गतसंशयाः ।**—मध्वभाष्ये.

*" Mutual love may be compared to Heaven."* —*Joshua Cooke.*

*" All pains are nothing in respect of this;*
*All sorrowes short that gain eternall blisse."* —*Spenser.*

## अध्याय सहावा

**स्वार्थ** आणि **काम** हे स्वभावतःच मनाला आपल्या इच्छेप्रमाणें ओढीत नेतात; किंबहुना ज्ञात्यांनासुद्धां मन आवरणें कठीण जातें. मागील अध्यायांत सर्व कर्में **निरपेक्षबुद्धीनें** करीत राहून तीं ईश्वरार्पण करण्याविषयीं बोध केला. तथापि, कर्में करीत असतांना सर्व बाबतींत परिमित आचरण करून मन व इंद्रियें ताब्यांत ठेवणें व त्यायोगें आपली उन्नति करून घेणें, ही गोष्ट शिकविण्यासाठीं साहाव्या अध्यायाची आवश्यकता **भगवंताना** भासली.

या अध्यायाला निरनिराळ्या गीताग्रंथांत निरनिराळीं नांवें-कांहींत **ध्यानयोग**, तर कित्येकांत **अध्यात्मयोग** आणि कांहींत **आत्मसंयमयोग** अशीं-आढळतात. वस्तुतः या अध्यायांत, आपण **स्वतःच-आत्मा-**आपल्या बऱ्यावाईट परिणामास कसे कारणीभूत होतों, व मन चंचल ( ओढाळ ) असल्यामुळें आत्म्याचें ( मनाचें ) संयमन करणें कसें आवश्यक आहे, यांविषयीचें स्पष्टीकरण आलें आहे. म्हणून सतत ध्यान-चिंतन करून आपण आपलें मन बाह्य विषयांवरून काढणें, व अंतीं आत्मभूति साधणें या दृष्टींनीं **ध्यानयोग** हेंच नांव वरील तीनहि नांवांत

अधिक अर्थबोधक होईल. आत्मभूतीसाठीं आत्मसंयम करणें किंवा **संयतात्मा** होणें हें अनुसरून आलेंच. आत्मसंयमाखेरीज निष्काम कर्म साधणेंच शक्य नाहीं. यावरून या अध्यायांतील उपदेशाचें महत्व ध्यानांत येईल.

**६२. उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् ॥**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥**

ऊर्ध्वं धरेत् **उद्धरेत्**—विध्य. तृ. ए. *pot.* 3rd sing. of उत्+धृ १,१० प. उद्धार करणें, बाहेर काढणें. 1. 10 P. to raise up, save, deliver. **अवसादयेत्**—( अव+सद् १ प. ) अवनति करावी, अधोगतीस न्यावें. Should ruin, fail, sink down. **आत्मा** ( आत्मन् )-स्वतः, आपण, The self. **हि**—( अ. ) कारण. *ind.* Because. **बंधुः**—हितकर्ता; भाऊ. Helping mate; a brother. **एव**—अ. च, मात्र; खरोखर. *ind.* Too, also, only; verily. **रिपुः**—शत्रु, वैरी. An enemy.

**अन्वयः**—आत्मना आत्मानम् उद्धरेत् । आत्मानम् न अवसादयेत । हि, आत्मा एव आत्मनः बन्धुः, आत्मा एव आत्मनः रिपुः ( च अस्ति ) ।

**अर्थः**—मनुष्यानें **आपली आपणच उन्नति करून घ्यावी.** स्वतःची अवनति होईल असें करूं नये. कारण, मनुष्य स्वतःच्या बऱ्या-वाईट कर्मानुसारच आपला आपण हितकर्ता किंवा वैरी ठरत असतो-आपल्या कल्याणाला अगर अकल्याणाला, दुसरें कोणी नसून, आपलें सत्कृत्य किंवा दुष्कृत्यच कारणीभूत असतें. ५

A man should raise himself by himself; he should not sink himself down. Because, he himself is his friend or foe, according to his righteous or sinful actions.—Elevation or decline depends upon one's own actions, good or bad. 5

**नात्मानमवमन्येत पूर्वाभिरसमृद्धिभिः ।**
**आमृत्योः श्रियमन्विच्छेन्नैनां मन्येत दुर्लभाम् ॥**—मनु.४-१३७
**उद्धरेन्मनसा जीवं न जीवमवसादयेत् ।**
**जीवस्य बन्धुः शत्रुश्च मन एव न संशयः ॥** —ब्रह्मवैवर्ते.

*"It is a great mistake for people to value themselves less than they are worth."* —*Goethe.*

*"I sent my Soul through the invisible,*
*Some letter of that after-life to spell,*

*And by and by my Soul returned to me,*
*And answered 'I myself am Heaven and Hell.'"*—*O. Khyyam.*
*" A man's worst enemy is the one in the breast."* —*Seneca.*
*" God helps those who help themselves."* —*A. Sidney.*
*" " For, man is man and master of his fate."* —*Tennyson.*

**६३. जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ॥**
**शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥**

**जितः**—भू. धा. वि. *p. p.* of जि—१ प. जिंकणें, ताब्यांत ठेवणें. 1 P. to conquer, subjugate. जितः आत्मा येन, यस्य वा ( ब. स. ) सः **जितात्मा**—यतचित्त, यतात्मा. Self-conquered.; तस्य **जितात्मनः**. प्रकर्षेण (विशेषेण) शान्तः **प्रशांतः**—शांतचित्त. Peaceful; serene. तस्य **प्रशांतस्य**. सम्यक् आहितः **समाहितः**—( भू. धा. वि. *p. p.* of सम् + आ + धा—३ उ. ) समदृष्टि व स्थिर; एकाग्र, शांत. Impartial and firm or steady; concentrated, tranquil. **परमात्मा** ( परम + आत्मन् )—**पुरुषोत्तम**; प्रकृतीच्या गुणांपासून मुक्त–अलिप्त असा आत्मा; परमेश्वर. The supreme self or spirit; the self freed from the three essential qualities; the Supreme God. शीतं च तत् उष्णं च **शीतोष्णे** ( द्वं. स. ), सुखं च दुःखं च **सुखदुःखे** ( द्वं. स. ), शीतोष्णे च सुखदुःखे शीतोष्णसुखदुःखानि ( द्वं. स. ), तेषु **शीतोष्णसुखदुःखेषु**. मानः च अपमानः मानापमानौ ( द्वं. स. ), तयोः **मानापमानयोः**.

**अन्वयः**—जितात्मनः प्रशान्तस्य **परमात्मा** शीतोष्णसुखदःखेषु तथा मानापमानयोः समाहितः ( भवति ) ।—समाधिं प्राप्तः, हृदि संनिहितः वा भवति ।

**अर्थः**—ज्यानें आपलें मन ताब्यांत ठेविलें आहे व जो शांतातित्त आहे, त्याचा तो ( त्रिगुणांपासून अलिप्त असा ) **श्रेष्ठ आत्मा** शीतोष्ण, सुखदुःख व मानापमान या द्वंद्वांच्या बाबतींत अत्यंत समदृष्ट ( सम व स्थिर ) झालेला असतो—अनुकूल किंवा प्रतिकूल परिस्थितिविषयीं तो बेफिकीर असतो. ७

The highest Self of him who has conquered himself and reached serenity, is indifferent as well as steady in cold and heat, in pleasure and pain and in honour and dishonour—He never cares for either prosperity or adversity. 7

**आत्मा क्षेत्रज्ञ इत्युक्तः संयुक्तः प्राकृतैर्गुणैः ॥**
**तैरेव तु विनिर्मुक्तः परमात्मेत्युदाहृतः ॥ १ ॥**—शांति.१८७-२४

*"He is the most powerful who has himself in his power."*
—*Seneca*

६४. **ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः।**
**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः॥ ८॥**

ज्ञायते अनेन इति **ज्ञानम्**—आधिभौतिक ज्ञान. Knowledge of material science. विशेषेण ज्ञायते अनुभूयते वा इति **विज्ञानम्**—अध्यात्मज्ञान; अनुभवजन्य ज्ञान. Knowledge of spiritual science, or that of experience. ज्ञानं च विज्ञानं च ज्ञानविज्ञाने (द्वं. स.), ताभ्यां तृप्तः आत्मा यस्य (ष. ब स.) सः **ज्ञानविज्ञानतृप्तात्मा**—ज्याचा आत्मा ज्ञान आणि विज्ञान यांनीं पूर्णावस्थेस पोहोंचला आहे तो. One whose soul is reached its perfection through material as well as spiritual knowledge. कूटे तिष्ठति **कूटस्थः**—शिखराला पोहोंचलेला; अव्यय अचल असा ( परमात्मा ). Standing at or occupying the highest place; the Supreme Soul which is immoveable, unchangeable and perpetually the same. विशेषेण जितानि इंद्रियाणि येन सः (ब. स.) **विजितेंद्रियः**—ज्यानें इंद्रियें ताब्यांत ठेविलीं आहेत तो. Sense-subdued. **युक्तः**—भू. धा. वि. *p. p.* of युज्–७ उ. मिलाफ होणें; जोडणें-मन एकाग्र करणें. 7. U. to join; attach; concentrate one's mind upon. **युक्तः**—सिद्धावस्थेला पोहोंचलेला, योगारूढ; **कर्मयोगी** Attained to the Supreme Spirit, engaged in profound meditation; an inspired sage; *man of Action*. **उच्यते**—कर्म. व. तृ. ए. *pass. pre.* 3rd sing. of वच्–२ प. बोलणें, म्हणणें. 2 P. to speak, say. **योगी**—(योगिन्)–योगाभ्यासी, कर्मयोगी. Practising Yoga or deep contemplation of action. **लोष्टः**, लोष्टं—मातीचें ढेंकूळ. A lump of earth. **अश्मन्**—दगड. A stone. **कांचनं**—सोनें. Gold. लोष्टं च अश्मा च कांचनं च **लोष्टाश्मकांचनानि** (द्वं. स.); समानि लोष्टाश्मकांचनानि यस्य सः (ष. ब. स.) **समलोष्टाश्मकांचनः**—ज्याला माती, दगड व सोनें सारखींच वाटतात तो. One to whom a lump of earth, a stone and gold are the same.

**अन्वयः**— ज्ञानविज्ञानतृप्तात्मा, विजितेंद्रियः, समलोष्टाश्मकांचनः, कूटस्थः योगी **युक्तः** इति उच्यते।

**अर्थः**—जो ज्ञान आणि विविध अनुभव यांनीं अंतःकरण संतुष्ट झाल्यामुळें पूर्णतेस पोहोंचला आहे; ज्यानें आपलीं इंद्रियें ताब्यांत ठेविलीं आहेत; ज्याला माती, दगड व सोनें हीं सारखींच वाटतात, आणि ज्याला परम **अव्यय पद** ( कूटस्थः ) प्राप्त झालें आहे. अशा कर्मयोग्यालाच **सिद्ध** ( युक्तः ) **पुरुष** म्हणतात. ८

**The** Yogin ( an Ascetic practising Yoga of Action ), who is contented with the knowledge of spiritual and material sciences, whose senses are subdued, to whom a clod, a stone and gold are the same, and who has attained his Supreme Goal (literally stead- fastly seated ), is said to be an inspired sage. 8

**मातृवत्परदारेषु परद्रव्येषु लोष्टवत् ।**
**आत्मवत्सर्वभूतेषु वीक्षन्ते धर्मबुद्धयः ॥ १ ॥**—पंचतंत्रे.

" *He is the greatest conqueror who has conquered himself.* "
—*English Proverb.*

" *He has enough who is content.* " —*French Proverb.*

**६५. युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥**

**युक्त**—बेताचें, प्रमाणशीर, योग्य, परिमित. Moderate, fitted, proper, right. आहारः च विहारः च आहारविहारौ ( द्वं. स. ), युक्तौ आहार-विहारौ यस्य (ब. स.) सः **युक्ताहारविहारः**, तस्य युक्ताहारविहारस्य. **आहार**—खाणें. Eating. **विहारः**-क्रीडा, खेळ. Amusing, playing. **चेष्टा**—कर्म, क्रिया. Action. युक्ता चेष्टा यस्य सः ( ब. स. ) **युक्तचेष्टः**—योग्य कर्माचरण करणारा. He who performs right action. स्वप्नश्च अवबोधश्च **स्वप्नावबोधौ**: (द्वं. स.), युक्तौ स्वप्नावबोधौ यस्य सः (ब. व. स.) **युक्तस्वप्नावबोधः**—ज्याची झोप आणि जागृति नियमित आहेत तो. One who observes moderation in sleep and wakefulness. **योगः**-समाधि, मनाची एकाग्रस्थिति; **कर्मयोग**. Deep concentration of mind; *Yoga of Action.*

[ **योगः**—हिंदुधर्माच्या **सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा** व **वेदान्त** या सहा शास्त्रांपैकीं दुसरें. या शास्त्राचा आद्य जनक महाभाष्यकार **पतंजलि** होय. कोणी **योगशास्त्र** हा सांख्यशास्त्राचाच दुसरा भाग समजतात. **योगशास्त्राचा** उद्देश हा आहे कीं, सतत व दीर्घ ध्यान-मनन-चिंतन करून व मनाच्या अचल एकाग्रतेनें, मानवी आत्म्याचें ईश्वरी तत्त्वाशीं तादात्म्य ( एकरूपता ) संपादून दोषमुक्त होणें. सांख्यशास्त्राचा कल्पक **कपिल मुनि**. या शास्त्राच्या तत्त्वांची पंचवीस ही संख्या मर्यादित असल्यानें याला **सांख्यशास्त्र** म्हणतात. सर्व जग जड **प्रकृतीच्या** त्रिगुणांनीं व्यापिलें असल्यानें, पंचविसावें तत्त्व जें पुरुष ( आत्मा ), त्याला प्रापंचिक बंधनापासून मुक्त करून अक्षय मोक्षपद मिळवून देणें हा या शास्त्राचा

उद्देश आहे. जगाच्या उलाढालीला व वाढीला त्रिगुणात्मक **प्रकृती** हीच कारण असून **पुरुष** अगदीं निष्क्रिय व स्वस्थपणें पाहणारा असा आहे, असें सांख्यमत शिकवितें. जगाचा कर्ता व शास्ता ईश्वर आहे, हें वेदांताचें मत सांख्य-तत्त्वज्ञान मानीत नाहीं. Yoga is the second of the six principal systemes of Hindu Philosophy. This Yoga philosophy was established by Patanjali, the author of the Mahabhashya. It is considered by some to be the second division of the Sankhya Philosophy. The chief aim of the Yoga system is to secure final absolution for the human soul completely united with the Supreme Spirit, by means of deep abstract meditation, and concentration of mind. The Sankhya Philosophy was established by Kapil Mahamuni. This philosophy is so called because it 'enumerates' ( संख्या ) twenty five *tattwas* ( true principles ). Its chief object is to effect the final emancipation of the twenty-fifth principle, *i. e.* the Purush ( or the Soul ), from the worldly bonds This philosophy regards the whole Universe as a development of three qualities of an inanimate principle called Prakriti. The Prakrit or the Nature it adds, is the cause of worldly activities, and the Purush is passive and simply a looker-on. Sankhya does not admit God as the creator and controller of the universe as the Vedas do.] दुष्टानि खानि यस्मिन्, दुष्टं खनति वा इति दुःखं, दुःखं हन्ति इति दुःखहा ( उप. त. स )—दुःखहन्-दुःख नाश करणारा. Pain-killer.

**अन्वयः**—युक्ताहारविहारस्य, कर्मसु युक्तचेष्टस्य, युक्तस्वप्नावबोधस्य ( योगिनः ) योगः दुःखहा भवति ।

**अर्थः**—ज्याचा आहार-विहार मर्यादित, कर्माचरण योग्य, आणि झोप व जागृति (सावधान) योग्य-परिमित-असतात, अशा योग्याला हा **( समाधि ) योग** दुःखहारक ( सुखदायक ) होतो. १७

**The Yoga of one, who is moderate in eating and amusements, who is restrained in his actions, and who is regulated in his sleep and wakefulness, kills all pains ( puts an end to all sorrows ). 17**

**अतियोगमयोगं च श्रेयसोऽर्थी परित्यजेत्** –भा. शां. २८७-२४.
**बुद्ध्या भयं प्रणुदति तपसा विन्दते महत् ।**
**गुरुशुश्रूषया ज्ञानं शान्तिं योगेन विन्दति ॥** –भा. उ. ३६-५२.

*"Moderation is the silken string running through the pearl chain of all virtues."* —*Bishop Hall.*

**६६. यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥**

**पश्यति**—( दृश्-१ प. ) पाहतो; जाणतो. Sees, knows, observes. **मयि**—( सप्त. ए. loc. sing of **अहम्**-मी, I. ) माझ्या ठिकाणीं, मजमध्यें. In me. प्रकर्षेण नश्यति इति **प्रणश्यति**—नाहींसा-नष्ट होतो; मरतो. Perishes; disappears; dies.

**अन्वयः**—यः माम् सर्वत्र पश्यति, ( यः ) सर्वं मयि पश्यति च, तस्य अहम् न प्रणश्यामि, सः च मे न प्रणश्यति ।

**अर्थः**—जो **मला** ( परमेश्वराला ) सर्वत्र-सर्व वस्तूंत-आहे असें जाणतो, व सर्व वस्तुमात्र **माझ्या**ठायीं आहे असें मानितो, त्याला **मी** कधींहि अंतरत नाहीं, व **मला**हि तो कधीं सोडून जात नाहीं. ३०

He who sees Me in all things and oberves all things in Me, to him I am never lost nor he to Me. 30

**सर्वदा सर्वभूतेषु समं मां यः प्रपश्यति ।**
**अचला तस्य भक्तिः स्याद्योगक्षेमं वहाम्यहम् ॥ १ ॥** –गारुडे.
**सर्वभूतेषु चात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।**
**समं पश्यन्नात्मयाजी स्वाराज्यमधिगच्छति ॥** –मनु. १२-९१.

*"God enters by a private door into every individual."*
—*Emerson.*

*"In that day ye shall know that I am in my Father, and ye in me, I in you."* —*S. John 14-20.*

अर्जुन म्हणतो. Arjuna says:—

**६७. चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥**

**चंचल**—वि. अस्थिर, चलबिचल होणारें. *adj.* Unsteady, shaking. **कृष्णः**—वसुदेव देवकीचा आठवा मुलगा व **विष्णूचा** आठवा अवतार. Eighth son of Vasudeo-Devaki, and eighth incarnation of Vishnu. भक्तजनपापादिदोषाकर्षणात् **कृष्णः**—शांकरभाष्ये प्रकर्षेण मथ्नाति, प्रकर्षेण इंद्रियाणि मथितुं शीलं यस्य वा इति **प्रमाथिन्**—प्रमादशील, क्षोभ उत्पन्न करणारें. Tormenting, harassing; agitating. बलं अस्य अस्ति इति **बलवत्** (पु. **बलवान्**, स्त्री. **बलवती**)—बळकट. Perverse, strong. नितांतं ग्रहः इति **निग्रहः**—विरोध; ताब्यांत किंवा दाबांत ठेवणें. Restraint, keeping in check, subjection. **मन्ये**—( मन्–४ आ. ) मी मानितों, माझी अशी कल्पना आहे. I think, I suppose. **इव**—अ. प्रमाणें, जणूं काय, खरोखर, इतकें. *ind.* Like, as if, indeed, just so. सुष्ठु दुःखेन क्रियते इति **सुदुष्करम्**—करण्यास अत्यंत कठीण. Very difficult.

**अन्वयः**—हि, कृष्ण! ( इदं ) मनः चंचलं, प्रमाथि, बलवत्, दृढं (च अस्ति)। अहम् तस्य निग्रहं वायोः इव सुदुष्करं मन्ये ।

**अर्थः**—कारण, अरे **कृष्णा,** मन हें अस्थिर, प्रमादशील, सहसा न वळणारें असें बळकट, व हेकेखोर आहे. त्याला विरोध करून ताब्यांत ठेवणें म्हणजे वाऱ्याची मोट बांधण्याइतकेंच दुर्घट काम आहे.

O Krishna ! the mind is very unsteady, harassing, perverse and obstinate. I deem it as hard to control as the wind. 34

**मनसश्चंचलत्वाद्धि स्थितिर्योगस्य वै स्थिरा ।**
**विनाभ्यासान्न शक्या स्याद्वैराग्याद्वा न संशयः ॥** –व्यासयोगे.
**मनसो वृत्तिशून्यस्य ब्रह्माकारतया स्थितिः ।**
**यः संप्रज्ञातनामासौ समाधिरभिधीयते ॥** –योगशास्त्रे.

*"In Narure there is no blemish but the Mind"*
—*Shakespeare–The Twelfth Night.*

*"My son, trust not to thy feeling, for whatever it be now, it will quickly be changed into another thing. As long as thou livest thou art subject to mutability, even against thy will."–The Imitation of Christ.*

[ मन चंचल आहे, व कोणालाहि त्या चंचलत्वामुळेंच योगसिद्धि प्राप्त होणें कठीण जातें. मन अस्थिर असलें तर बारिकसारीक कार्येंहि पार पडत नसतात, ही सर्वसामान्य व अनुभवाची गोष्ट आहे. हीच अडचण **अर्जुनाला** भासली व त्यानें

योग्य मार्ग दाखविण्याला **भगवंताना** विनविलें. व त्याप्रमाणें, **भगवंतांनीं**हि पुढील दोन श्लोकांत चंचल मनाला कसें ताब्यांत ठेवावें, याविषयीं मार्ग सांगितला आहे.

The mind is unsteady and therefore, one can hardly attain the perfection of Yoga. It is a wellknown and experienced fact that even the petty works are left halves if the performer's mind is shaky. The same difficulty stood before Arjuna, who asked Lord Krishna to guide him properly. Accordingly, The Lord explained in the following two verses, the ways and means of curbing the obstinate mind. ]

**६८. असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥**

न संशयः यथा स्यात् तथा, नास्ति एव संशयः यस्मिन् वा तत् **असंशयम्**—अ. निःसंशय, खात्रीनें. *ind.* Without doubt, surely. महांतौ च अमू बाहू यस्य सः (ष. ब. स.) **महाबाहुः**, तत्संबुद्धौ हे **महाबाहो**! अरे पराक्रमी अर्जुना! O mighty armed Arjuna ! दुःखेन अपि निगृहीतुं अशक्यं **दुर्निग्रहं**—निग्रह करूनाहि आवरण्यास कठीण. Unrully, difficult to curb. चलति इति **चलम्**—चंचल, अस्थिर. Restless, flighty. विगतः रागः (इच्छा Desire) यस्मात् सः **विरागः**, विरागस्य भावः **वैराग्यम्**—प्रापंचिक किंवा इंद्रियसुखाविषयीं निरिच्छ. Absence of worldly desires and passions; asceticism. **दृष्ट-अदृष्ट-**इष्टभोगेषु ससाधनेषु दोषदर्शनेन वैतृष्ण्यं इति **वैराग्यम्**—नीलकंठी टीका. **गृह्यते**—कर्म. व. तृ. ए. *pass.* pre. 3rd sing. of **ग्रह्**—९ उ. ताब्यांत ठेवणें, घेणें. 9 U. to take or catch hold of, to be checked.

**अन्वयः**—महाबाहो ! मनः असंशयं दुर्निग्रहं चलं ( च अस्ति ) । तु कौन्तेय, अभ्यासेन वैराग्येण च ( तत् ) गृह्यते ।

**अर्थः**—अरे पराक्रमी अर्जुना, खरोखर, निग्रह करूनहि ताब्यांत ठेवण्यास अत्यंत कठीण, व अस्थिर असें हें मन आहे; तथापि हे कुंतिपुत्रा ! सतत अभ्यास व वैराग्य (निरिच्छ)-वृत्ति यांच्या योगानें (तें चंचल मनहि) ताब्यांत ठेवितां येतें. ३५

**O mighty-armed Arjuna, the mind is, undoubtedly, very difficult to curb, and restless; but, O son of Kunti ! (even) it can be checked by continued practice and by asceticism. 35**

**अत एव शनैश्चित्तं प्रसक्तमसतां पथि।**
**भक्तियोगेन तीव्रेण विरक्त्या च नयेद्वशम् ॥**—भाग.३-२७-५.
**अप्यब्धिपानान्महतः सुमेरून्मूलनादपि ।**
**अपि वह्न्यशनात्साधो विषमश्चित्तनिग्रहः॥**–योग० १-१६-३४.
**अभ्यासवैराग्याभ्याम् तन्निरोधः ।** –पातांजलयोगसूत्रम्.

*" The mind is its own place, and in itself,*
*Can make a heaven of hell, and hell of heaven."* —*Milton.*

*" O wretched impotence of human mind !*
*We erring, still excuse for error find,*
*And darkling grope, not knowing we are blind."*
—*Prior–Soloman.*

**६९. असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥**

**असंयत**—( अ + सम् + यम्—१ प. )—ताब्यांत नसलेलें. Unrestrained. असंयतः आत्मा यस्य सः (ष. ब. स.) **असंयतात्मा**--ज्याचें मन ताब्यांत नाहीं तो. He who has his mind unrestrained. दुःखेन प्राप्यते इति **दुष्प्रापः**—प्राप्त होणें–साधणें–कठीण. Hard to get; unattainable. वश्यः आत्मा यस्य सः (ब. स.) **वश्यात्मा** (वश्यात्मन्)--ज्याचें मन पूर्णपणें ताब्यांत आहे तो. He whose self is controlled. **यतता**—तृ. ए. Instr. sing. of यतत्–आर्षरूप–व. धा. वि. *pre. p.* of **यत्**--१ आ. प्रयत्न करणें. 1 A. to strive after. **यतता**—प्रयत्न करणाराकडून. पहा २३,७१. By him who has been **striving** after. **अवाप्तुं**--( इच्छा दर्शकरूप. *inf.* of अव + आप् ५ उ. ) साध्य करण्यास, संपादण्यास. For securing. उपायैः यथा स्यात् तथा इति **उपायतः**—प्रयत्नानें. By efforts–means, through proper means.

**अन्वयः**—असंयतात्मना योगः दुष्प्रापः इति मे मतिः । तु, यतता वश्यात्मना उपायतः ( अयं योगः ) अवाप्तुं शक्यः ( अस्ति ) ।

**अर्थः**—मन ज्याच्या कह्यांत नाहीं त्याला या योगासिद्धीची प्राप्ती होणें अत्यंत दुर्घट आहे, असें माझें मत आहे; परंतु जो सतत प्रयत्न करून आपलें मन ताब्यांत ठेवतो, त्यालाच ( अभ्यास व वैराग्य या ) प्रयत्नपूर्वक उपाययोजनांनीं ह्या योगाची सिद्धि मिळविणें शक्य आहे.

It is My conviction that the attainment of Yoga is impossible for him who has not restrained his mind; but it is attainable for him who has his mind controlled, and who strives through proper means (continued practice and asceticism). 36.

**वशे कृत्वेंद्रियग्रामं संयम्य च मनस्तथा ।**
**सर्वान्संसाधयेदर्थानक्षिण्वन्योगतस्तनुम् ॥** -मनु. २-१००.

"*Self can cloud the brightest cause,*
*Or gild the worst.*" —*T. Moore.*

७०. **पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।**
**न हि कल्याणकृत् कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥**

**अमुत्र**—अ. परलोकांत. *ind.* In the next world. विशेषेण नाशः **विनाशः**—विध्वंस. Destruction. **तस्य**—अर्धवट कार्य करणाऱ्या त्या योगभ्रष्टाचा. Of him who leaves his own duties half-done or incomplete. **कल्याणम्**—शुभ, शुभकर्म. Auspicious or salutary work. कल्याणं करोति इति **कल्याणकृत्**—सत्कार्य करणारा. Doing good or beneficial work. दुष्टा च असौ गतिः च **दुर्गतिः**—अधोगति. Misfortune, poverty. तनोति आत्मानं पुत्ररूपेण इति **तातः**—तत्संबुद्धौ हे **तात** !—अरे बाबा. O father ! अत्यंत जिव्हाळ्याच्या, प्रेमाच्या किंवा सन्माननीय व्यक्तीला संबोधितांना **तात** शब्दाची योजना करितात. This term is applied to any affectionate or venerable persons; fondling term. **गच्छति**—वर्त. तृ. ए. *pre.* 3rd. sing. of **गम्**—१ प. जाणें. 1. P. to go.

**अन्वयः**—हे पार्थ, तस्य ( कर्मयोगिनः ) विनाशः, न इह न अमुत्र ( अपि ) विद्यते । हि, तात ! कल्याणकृत कश्चित् दुर्गतिं न गच्छति ।

**अर्थः**—अर्जुना, अशा प्रकारें अर्धवट कर्म करणाऱ्या त्या योगभ्रष्टाचा इहलोकींच काय, पण परलोकींहि नाश होत नाहीं. कारण, बा अर्जुना ! सत्कृत्य करणारा कोणीहि मनुष्य अवनतीला जाणें शक्य नाहीं ! ४०

O Arjuna, the son of Prithā ! neither in this life nor in that to come is there destruction for him-who even left his duites incomplete. Because, no man performing auspicious duties, O beloved Arjuna ! can meet misfortune ! 40

**ऋषयो मनवो देवा मनुपुत्रा महौजसः ।**
**कलाः सर्वे हरेरेव सप्रजापतयः स्मृताः ॥**
**एते स्वांशकलाः पुंसः कृष्णस्तु भगवान्स्वयम् ॥** —भागवते.

*" An honest man is the noblest work of God. "* —*Pope.*

*" Thy voice is on the rolling air,*
*I hear Thee where the waters run;*
*Thou standest in the rising Sun,*
*And in the setting Thou art fair. "* —*Tennyson.*

[ विभूतिविस्तार श्लोक २१ पासून ३८ पर्यंत सांगितला असून त्यांत विष्णु, रवि, वायु, चंद्र, सामवेद, मन, चेतनाशक्ति, शंकर, कुबेर, अग्नि, मेरु, बृहस्पति, सागर ॐकार, नारद, उच्चैःश्रवा ( घोडा ) इत्यादि सर्व, त्या त्या वस्तुसमूहांत **मीच** होय, असें उदाहरणानें सांगितलें आहे. इतकेंच काय, पण ' आयुधांत **वज्र,** सर्पांत **वासुकी,** दैत्यांत **प्रल्हाद,** शस्त्रधाऱ्यांत **राम,** प्रवाहांत **भागीरथी,** छंदांत **गायत्री-मंत्र,** जुगारांत **द्यूत,** पांडवांत **धनंजय,** दमन करणारांचा **दंड** व ज्ञात्यांतील **ज्ञान**सुद्धां **मीच** आहें. " असें भगवंतांचें सांगणें आहे. **सर्व भाग बहुधा वर्णनात्मक असल्यानें सुभाषितेंहि फारशीं नाहींत.**
God's all-pervading Splendour has been described in the verse 21 to 38, and Bhagavan Himself has told Arjuna His very existence in all creatures and things. He says "I Am the Vāsuki among serpents, Bhāgirathi-Ganges-among the water-streams, and Arjuna among Pāndavas. Also I Am the Brightness of the sun, knowledge of the Learned, wisdom of the wise, and Omkār of the Vedas-etc." The major portion of this chapter being almost descriptive, it has no more Subhashitas. ]

---

## अध्याय अकरावा



मागील अध्यायांत **विभूतियोग** सांगतांना " माझाच स्वरूपविस्तार सर्वत्र आहे, " असें भगवंतांनीं म्हटलें. त्यावर अर्जुनानें उत्कंठित मनानें, " सर्व विश्वांत व्यापून उरलेलें तुझें **विश्वरूप** तरी कसें आहे तें मला दाखीव, म्हणजे माझी

खात्री होईल." अशी विनवणी केली. तिचें समाधान म्हणून भगवंतानीं आपलें **जगद्व्याळ विश्वरूप** अर्जुनास एकदम दाखवून त्यास दिङ्मूढ करून टाकिलें; आणि तें स्वरूप नीट न्याहाळून पाहतां यावें, म्हणून त्यास दिव्यदृष्टिहि दिली (गी. ११-८). या अध्यायांतील मुख्य भाग म्हणजे भगवंताचें **विश्वस्वरूप.** त्याचें यथातत्त्व वर्णन १५ ते ३० श्लोकांत आलें आहे, व म्हणूनच या अध्यायाला "**विश्वरूपदर्शन**" असें नांव दिलें आहे. **भगवंताच्या विश्वरूपाचेंच वर्णन मुख्यतः असल्यानें या अध्यायांतहि फारशीं सुभाषितें नाहींत.**

"कर्ता करविता परमेश्वर" या म्हणण्याप्रमाणें भगवंतच स्वतः प्रत्येकास निक्षून सांगतात कीं, "लोकांचा नाश करणारा कालहि **मीच** आहें, म्हणून तूं आपल्या कार्यास लाग, आणि यश घे. सर्व गोष्टींचा यथायोग्य निकाल मी पूर्वींच लावून ठेविला आहे. मात्र कोणी तरी कारणीभूत झालें पाहिजे." हेंच सत्य पुढील श्लोकांत सांगितलें आहे. भगवान् म्हणाले—The Blessed Lord said:—

**१२. कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो**
**लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे**
**येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ ३२ ॥**

कालः—यम; नाश करणारा. The God of Death; the destroyer.

**कालः पचति भूतानि कालः संहरते तथा ॥**
**कालः सुप्तेषु जागर्ति कालो हि दुरतिक्रमः** —चाणक्यनीतिः

**अस्मि**—व. प्र. पु. ए. *pre.* 1st sing. of **अस्**—२ प. असणें, होणें. 2 P. to be. लोकस्य क्षयः (ष. त. स.) **लोकक्षयः**, लोकक्षयं करोति इति **लोकक्षयकृत्** (उप. त. स.)—लोकनाश करणारा. Destroyer of the world. प्रकर्षेण वृद्धः **प्रवृद्धः**—विशेष वाढलेला; आग्रही, हट्टी. Grown up; haughty. लोक्यते असौ **लोकः**—विश्व. The world. [लोक तीन प्रकारचे आहेत:-स्वर्ग, पृथ्वी व पाताळ. पृथ्वीवरून स्वर्गाकडे एकीहून एक चढत्या पायऱ्या ७, तशाच पाताळाकडेहि एकीहून एक उतरत्या पायऱ्या ७ आहेत. There are three Lokas:—स्वर्ग (The Heaven), पृथ्वी (The Earth or world), and पाताल (The Lower world). To go to the highest region (स्वर्ग), there are seven higher steps rising from the earth (पृथ्वी), one above the

other : भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक महर्लोक, जनर्लोक, तपर्लोक and सत्य-लोक or ब्रह्मलोक; to the lowest region ( पाताळ ) also, there are seven steps descending from the earth ( पृथ्वी ) one below the other : अतल, वितल, सुतल, रसातल, तलातल, महातल and पाताल. ]. सम्यक् हर्तुं समाहर्तुम्—( हेत्व. धा अ. *Inf.* of सम्+आ+हृ—१ प. समूळ नाश-विध्वंस करणें. 1 P. to destroy or annihilate. )—पूर्ण नाश करण्यासाठीं. For destruction. इह—अ. येथें; या जगांत. *ind.* Here; in this world. प्रवृत्तः—भू. धा. *p. p.* of प्र+वृत १ अ. निघणें, तयार होणें. 1 A. to proceed with, set in-on. ऋते—अ. ( बहुधा पंचमी, क्वचित् द्वितीया व तृतीया विभ. संबंध. Usually with abl. and rarely with acc. & instr. ) शिवाय, विना, वांचून. *ind.* Except, without. भविष्यन्ति—भवि. तृ. ब. *Fut.* 3rd pl. of भू—१ प. ( क्वचित् आत्म. Rarely A. ) असणें, होणें; जीवंत असणें. 1 P. To be, become; be alive. अवस्थिताः—( अव+स्था ) तयार—उभे असलेले. Standing, stood arrayed. अनिति ( जीवति ) अनेन तत् अनीकम्—सैन्य. Army. अनीकं अनीकं प्रति—प्रत्यनीकं—शत्रुपक्षाकडील सैन्य. A hostile army.

**अन्वयः**—( अहं ) लोकक्षयकृत्, प्रवृद्धः ( च ) कालः अस्मि । इह ( रण-भूमौ ) लोकान् समाहर्तुं ( अहं ) प्रवृत्तः । ये योधाः प्रत्यनीकेषु अवस्थिताः ( ते ) सर्वे त्वां ऋते अपि न भविष्यन्ति ।

**अर्थः**—( उत्पत्तीप्रमाणेंच ) लोकांचा नाश करण्यास विशेष वाढलेला ( तयार असलेला ) असा सर्वभक्षक **काळ मीच** आहें. येथें या रणभूमीवर लोकांचा संहार करण्यास **मी** सिद्ध झालों आहें. शत्रुपक्षाकडे लढण्यासाठीं जे योद्धे सज्ज असलेले दिसतात, ते सर्व तुझ्यावाचूनहि—तू नसलास तरी—नाहींसे होतीलच. ( तं त्यांना मारिलें नाहींस तरी ते मरतीलच, ही खात्री समज. ) ३२

I am the Supreme God of death which has grown up to destroy the world. I made My manifestation here, on this battle-field, to slay the mankind ! Even without your presence here, all the warriors standing in array in the hostile army shall die. ( Not even one of these warriors standing arrayed for fight will escape death, even though you were not to kill them. ) 32

**नियतं कालपाशेन बद्धं शक्र विकत्थसे ।**
**अयं स पुरुषः श्यामो लोकस्य हरति प्रजाः ॥**
**बद्ध्वा तिष्ठति मां रौद्रः पशुं रशनया यथा ॥** —मोक्षधर्मे.

"*The hand of the Lord hath wrought this; in whose hand is the Soul of every living thing, and the breath of all mankind.*" —*Job.*

"*Can honour's voice provoke the silent dust,*
*Or flattery sooth the dull cold ear of death?*" —*Gray.*

"*The world is an inn, and death the journey's end.*" —*Dryden.*

१३. **तस्मात् त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व**
**जित्वा शत्रून्भुंक्ष्व राज्यं समृद्धम् ।**
**मयैवैते निहताः पूर्वमेव**
**निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥**

**तस्मात्**—अ. त्यापासून, म्हणून. *Ind.* From that, therefore. तस्मात् हें तद् सर्व. पं. ए. रूपहि आहे. This is also abl. sing. form of *pro.* तद्. **उत्तिष्ठ**—आज्ञा. द्वि. ए. Imp. 2nd sing. of उत् + स्था = (उत्था) १ प. उठणें, उभें राहणें. 1 P. to get up, stand. **लभस्व** (आज्ञा. लभ्)—मिळव, संपादन कर. *Imp.* Do get, have, obtain. **जित्वा**—(धा. अ. *Ger.* of जि) जिंकून. Having conquered. **भुंक्ष्व**—(आज्ञा. द्वि. ए. Imp. 2nd sing. of भुज् ७ उ.) उपभोग घे, भोग. Enjoy, possess राज्ञः भावः कर्म वा **राज्यम्**—सत्ता, अधिकार; राजसत्ता. Rule; Royalty. सम्यक् ऋद्धं इति **समृद्धम्**—(सम् + ऋध्—४, ५ प.) ऐश्वर्यपूर्ण, भरभराटीस पोहोंचलेलें. Prosperous, flourishing. निश्चयेन हतः **निहतः**—(भू. धा. *p. p.* of नि + हन्–२ प.) ठार मारलेला. Killed, slain. निमित्तं मात्रा यथा स्यात् तथा (अव्य. स.) **निमित्तमात्रम्**—कारणीभूत, केवळ निमित्त. Only an apparent cause, or outward pretext. **भव**—आज्ञा. द्वि. ए. *Imp.* 2nd sing. of भू—१ प. होणें, असणें. 1 P. to be, become. सव्येन हस्तेन शराणां क्षेपात्, सव्येन हस्तेन सचितुं शीलं यस्य वा सः (ब. स.) **सव्यसाचिन्**—(सव्य—डावा. Left.; **साचि**—अ. वांकडे, तिरपें. *ind.* Obliquely, crookedly, awry. डाव्या हातानेंहि बाण मारणारा–अर्जुन. Arjuna who plays arrow-throwing even by his left hand.

**उभौ मे दक्षिणौ पाणी गांडीवस्य विकर्षणे ।**
**तेन देवमनुष्येषु सव्यसाचीति मां विदुः ॥** -विराट. ४४-१९.

**अन्वयः**—तस्मात हे सव्यसाचिन्, त्वं उत्तिष्ठ, यशः लभस्व, शत्रून् जित्वा समृद्धं राज्यं भुङ्क्ष्व । मया एव एते ( दुर्योधनादिकौरवाः ) एव निहताः । ( त्वं केवलम् ) निमित्तमात्रं भव ।

**अर्थः**—म्हणून सव्यसाची अर्जुना, चल ऊठ; यशकीर्ति संपादन कर. आणि शत्रूंना जिंकून ऐश्वर्यसंपन्न राज्याचा उपभोग घे. तुझे हे ( कौरवादि शत्रू ) मी यापूर्वींच मारून ठेविलेले आहेत, मात्र तूं निमित्त म्हणून पुढें हो. ३३

O Arjuna, the thrower of arrows with both hands, stand up! Win glory for yourself, and having conquered your enemy, enjoy a prosperous kingdom. By Me these ( Kauravas and others ) have been slain already O Arjuna! be you merely an outward cause ( and go on with fighting ). 33

**एको दवः सर्वभूतेषु गूढः । सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ॥**
**कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः । साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥**
—कृष्णय. श्वे. उ. अ. ६.

*" If angels fight,*
*Weak men must fall; for Heaven still guards the right."*
—*Shakespeare-Richard II. Act III., Sc. II.*

*" For those whom God to ruin has designed,*
*He fits for fate, and first destroys their mind."* —*Dryen.*

*" The aim, if reached or not, makes great the life:*
*Try to be Shakespeare, leave the rest to fate."* —*R. Browning.*

*" Hands of invisible spirits touch the strings*
*Of that mysterious instrument, the Soul,*
*And play the prelude of our fate."* —*Longfellow.*

**९४. मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ॥**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥**

मदर्थं कर्म इति **मत्कर्म**, मत्कर्म करोति इति **मत्कर्मकृत**—( उप. त. स. ) मजसाठीं कर्म करणारा. One who works for Me. **अहं** एव परमः परा गतिः वा यस्य सः ( ब. स. ) **मत्परमः**—मत्परायण; भगवत्परायण. Solely occupied with Me-the Lord. संगेन वर्जितः इति ( उप. स. ) **संगवर्जितः**—( वृज् १ प. १० उ. ) आसक्तिरहित, संसार-संगविरहित. Freed from attach-

ments to worldly ties. निर्गतं वैरं यस्मात् सः ( ब. स. ) **निर्वैरः**—( निर्–नाहीं. Not; वैरम्—शत्रुत्व. Enmity ) ज्याचें कोणाशींहि वैर नाहीं तो. One without hatred of any being. **एति**—( व. तृ. ए. *pre.* 3rd sing. of इ—२ प. जाणें, पोहोंचणें. 2 P. to go, attain. ) येऊन पोहोंचतो. Comes, attains. पण्डोः अपत्यं पुत्रान् **पाण्डवः—पांडवानां धनंजयः**—पंडुपुत्र धनुर्धारी **अर्जुन**. Arjuna, the archer, son of king Pandu.

**अन्वयः**—पांडव, यः मत्कर्मकृत्, मत्परमः, मद्भक्तः, संगवार्जितः, सर्वभूतेषु निर्वैरः ( च अस्ति ), सः माम् एव एति।

**अर्थः**—पंडुपुत्रा अर्जुना ! जो **म**जसाठींच विहित कर्म करितो, **मा**झ्याशीं एकजीव होऊन जातो, **मा**झी एकनिष्ठेनें भक्ति करितो, कर्मफलाविषयीं आसक्ति बाळगीत नाहीं, आणि सर्व प्राणीमात्रांच्या ठायीं स्नेहबुद्धीनें वागतो, तो **मा**झा भक्त शेवटीं **म**लाच येऊन पोहोंचतो. ५५

He who does prescribed actions for Me, whose highest object is Myself, who worships only Me without worldly attachments, and bears no hatred towards any being, O son of Pandu!—he comes to Me alone. 55

**न यस्य स्वः पर इति वित्तेष्वात्मनि वा भिदा।**
**सर्वभूतसमः शांतः स वै भागवतोत्तमः॥** —भाग. ११-२-५२.

**अविनयमपनय विष्णो दमय मनः शमय विषयमृगतृष्णाम्।**
**भूतदयां विस्तारय तारय संसारसागरतः॥** –शंकराचार्याः

*" At church on Sunday to attend.*
*Will serve to keep the world thy friend."* —*Clough.*

*" In the vast cathedral leave him;*
*God accept him, Christ receive him."* —*Tenneyson.*

*" For whosoever shall call up on the name of the Lord shall be saved "* —*Romans X. 13.*

# अध्याय बारावा



अन्य ठिकाणीं मन जाऊं न देतां एकनिष्ठपणें भक्ति करणें, हें अनन्यभावित्व नवव्या अध्यायांत गुह्यज्ञान म्हणून वर्णिलें. या ज्ञानाच्या किल्लीनें अक्षय अशा परम गतीचे दरवाजे उघडून आंत प्रवेश करणारे भक्तहि तितकेच श्रेष्ठतम असावे लागतात; आणि अशा भक्तांच्या कार्यासाठीं भगवंतालाहि नाइलाजास्तव, कर्तव्य म्हणून धावून येणें भाग पडतें. म्हणून अशा श्रेष्ठतम भक्तांचीं लक्षणें सांगण्यासाठीं या बाराव्या अध्यायाची योजना आहे. भगवंताला कोणते भक्त आवडतात, व त्यांचें आचरण-कर्म-कसें असावें वगैरे गोष्टींचें स्पष्टीकरण या अध्यायांत आलें असल्यानें याला **भक्तियोग** हें नांव दिलें आहे. प्रियभक्त कसे असावे याचें वर्णन श्लोक १३ ते २० पर्यंतच्या भागांत दिलें असून कांहीं स्थळीं द्विरुक्ति झाली आहे.

**९५. श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ॥**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥ १२ ॥**

**श्रेयः**—( तारतम्यभावदर्शक न. रूप. *Comp.* n. form of प्रशस्य-स्तुत्य, चांगलें. Praiseworthy.) अधिक चांगलें. Better. अभ्यस्यते अस्मिन् इति **अभ्यासः** ( अभि + अस्—४ प. ) पुनः पुनः करणें, म्हणणें; आत्मा व चैतन्य यांच्या एकत्वाकडे एकाग्र मन करून संवय लावणें. Repeated practice; constant use or practice of oneness of the soul and spirit. ध्यायते अनेन इति **ध्यानम्**—सतत चिंतन, विचार. Practice of constant meditation. विशेषेण शिष्यते इति **विशिष्यते**—कर्म तृ. ए. *pass.* 3rd sing of **वि + शिष्—** ७ प. अधिक-जास्त-विशेष होणें-असणें. 7 P. To particularize, distinguish, aggravate. कर्मणः फलं **कर्मफलं** ( ष. त. स. ), त्यज्यते अनेन इति त्यागः; कर्मफलस्य त्यागः ( ष. त. स. ) **कर्मफलत्यागः**—कर्मफलाची इच्छा न करणें. Renunciation of desire for fruit of action. न अंतरं यथा स्यात् तथा **अनंतरम्** ( अव्य. स. )-लगेच, ताबडतोब. Immediately after.

**अन्वयः**—अभ्यासात् ज्ञानं श्रेयः । ज्ञानात् ध्यानं, ध्यानात् च कर्मफलत्यागः विशिष्यते । हि, ( कर्मफल-) त्यागात् अनंतरम् शांतिः ( प्राप्यते ) ।

**अर्थः**—अभ्यासापेक्षां ज्ञान अधिक श्रेयस्कर, ज्ञानापेक्षां ध्यान-चिंतन-मनन विशेष महत्त्वाचें, आणि ध्यानापेक्षांहि कर्मफलाची अपेक्षा न करणें, हें अत्यंत श्रेष्ठ. कारण, असल्या कर्मफलत्यागापासूनच पुढें ताबडतोब शाश्वत शांति प्राप्त होते. १२

Konwledge is better than constant practice, practice of constant meditation is better than the knowledge, and renunciation of desire for fruit of action is better than even meditation ( Dhyān ); because, renunciation is immediately followed by the Eternal Peace. 12

अधिकं केवलाभ्यासाज्ज्ञानं तत्सहितं ततः ॥
ध्यानं ततश्चापरोक्षं ततः शान्तिर्भविष्यति ॥ १ ॥ —सामवेदे.

ज्ञानादुपास्तिरुत्कृष्टा कर्मोत्कृष्टमुपासनात् ।
इति यो वेद वेदान्तैः स एव पुरुषोत्तमः ॥ —सूर्यगी. ४–४७.

*" Our thoughts are heard in Heaven."* —*Young.*

*"They are never alone that are accompanied with noble thoughts."*
—*Sir P. Sidney.*

*" A man without knowledge, and I have read,*
*May well be compared to one that is dead."*—*Thomas England.*

१६. अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

१७. संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥

न द्वेष्टि इति **अद्वेष्टा**—द्वेष न करणारा. Not hating. मित्रतया वर्तते इति **मैत्रः**—स्नेहानें वागणारा. Friend. करुणां कुर्वन् इति **करुणः** ( करोति मनः आनुकूल्याय )—दयाशील. Tender, pathetic. मम इति भावः **ममः**, निर्गतं ममत्वं यस्मात् सः ( ब. स. ) **निर्ममः**—ममत्वरहित, आपपरभाव न मानणारा. Free from all connections with the outer world, or attachments. अहं करोमि इति भावः **अहंकारः**, निर्गतः अहं प्रत्ययः अहंकारः वा यस्मात् सः **निरहंकारः**—निरभिमानी. Free from egoism. दुःखं च सुखं च दुःखसुखे ( द्वं. स. ), समे दुःखसुखे यस्य सः **समदुःखसुखः**—सुखदुःखाविषयीं हर्ष—विषाद न मानणारा. सुख काय किंवा दुःख काय, दोन्ही सारख्याच रीतीनें स्वीकारणारा. One who is balanced in pleasures and pains, or who regards them equally. **क्षमी** ( क्षमिन् )—अपराधाबद्दल दया क्षमा दाखविणारा, क्षमाशील. Patient, forbearing.

यतःच असौ आत्मा च यस्य सः **यतात्मा** ( ब. स. )—आत्मसंयमन करणारा. Self-controlled. दृढः च असौ निश्चयः च यस्य सः ( ब. स. ) **दृढनिश्चयः**— खंबीर मनाचा, निश्चयी. Firm in his resolve. मनः च बुद्धिः च **मनोबुद्धी** ( द्वं. स. ), अर्पिते मनोबुद्धी येन सः ( तृ. ब स. ) **अर्पितमनोबुद्धिः**—ज्यानें आपलें मन व बुद्धि हीं अर्पण केलीं आहेत. One who has dedicated his both mind and reason. मम भक्तः इति **मद्भक्तः** ( ष. त. )—माझा सेवक. My devotee.

**अन्वयः**—यः सर्वभूतानां अद्वेष्टा, मैत्रः, करुणः एव च निर्ममः, निरहंकारः, समदुःखसुखः, क्षमी, सततं संतुष्टः, योगी, च यतात्मा, दृढनिश्चयः, मयि अर्पितमनोबुद्धिः च, सः मे भक्तः मे प्रियः ( अस्ति )।

**अर्थः**—कोणाहि प्राणीमात्राविषयीं वैरभाव न धरणारा, मित्रभावनेनें वागणारा, सहानुभूति दाखविणारा, त्याचप्रमाणें आपपरत्व न मानणारा, निरभिमानी, सुखदुःखाविषयीं हर्ष किंवा विषाद न बाळगणारा, क्षमाशील, नेहमीं आनंदी वृत्तींत असून कर्मयोगांत मग्न, आत्मसंयमी, दृढनिश्चयी, व **मा**झ्या ठिकाणीं आपलें मन व बुद्धि अर्पण करणारा, असा जो **मा**झा भक्त तोच **म**ला प्रिय होतो. १३-१४

That devotee of Mine who bears no ill-will to any being, who is friendly and compassionate, without attachments and egoism, equally balanced in pleasures and pain, forgiving, ever content, and ever harmonious in the yoga of action, self-controlled, firm in his resolve, and who has fixed his mind and reason in Me alone, he is dear to Me. 13-14

**यस्मिन्सर्वाणि भूतानि आत्मैवाभूद्विजानतः**
**तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ।** –ईशावास्योपनिषत्.

**यस्य चित्तं द्रवीभूतं कृपया सर्वजंतुषु ।**
**तस्य ज्ञानेन मोक्षेण किं जटाभस्मलेपनैः ॥** –पंचतन्त्रे.

**संतोषं परमास्थाय सुखार्थी संयतो भवेत् ।**
**संतोषमूलं हि सुखं दुःखमूलं विपर्ययः ॥** —मनु. ४-१२.

*" For the Love of God is broader,*
*Than the measures of man's mind,*

*And the heart of the Eternal,*
*Is most wonderfully kind."* —*Faber.*

*" If any man would come after me, let him deny himself, take up his cross, and follow me."* —*Matth. XVI. 24.*

# अध्याय तेरावा

**क्षेत्र** म्हणजे आपलें **शरीर**, व **क्षेत्रज्ञ** म्हणजे शरीरांत राहणारा किंवा शरीरास जाणणारा **आत्मा**. यांसच वेदांतशास्त्रांत अनुक्रमें **पिंड** आणि **ब्रह्मांड** अशीं नांवें आहेत . अर्थात्, **शरीर** व **आत्मा** म्हणजे **क्षेत्र** व **क्षेत्रज्ञ**, या दोहींबद्दल विवेचन या अध्यायांत केलें असल्यानें यास " **क्षेत्र-क्षेत्रज्ञविचार** " असें नांव दिलें आहे.

गीताशास्त्रांतील तत्त्वज्ञानाप्रमाणें **ज्ञानी** शब्दाची व्याख्या १३ व्या अध्यायांत श्लोक ७ ते ११ पर्यंत दिली आहे. तींत मुख्यतः निरभिमानित्व, अहिंसा, जरा-मृत्यूंना अत्यंत दोष समजणें, प्रपंचांत असूनहि त्याविषयीं उदासीन राहणें, आणि एकांतिक एकनिष्ठ भक्ति करणें, या गोष्टींचा समावेश होतो. क्षेत्र क्षेत्रज्ञांचें जें ज्ञान तेंच परमेश्वरी ज्ञान होय. म्हणून पुढील पांच श्लोकांत वर्णिलेले गुण-लक्षणें-ज्याच्या अंगीं असतील तोच **खरा ज्ञानी** किंवा परमेश्वरी अवतार गणिला जातो.

**९८. अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥**

मानः अस्य अस्ति इति **मानी**, मानिनः भावः **मानित्वं**, तस्य अभावः न मानित्वं वा इति **अमानित्वम्** ( न. स. )—नम्रता. Humility. देहोद्देशेन धर्मातिशयप्रदर्शकः यस्य अस्ति इति **दंभी**, दंभिनः भावः दंभित्वं, न दंभित्वम् **अदंभित्वम्** ( न. स. ) ढोंग न करणें. Unpretentiousness. प्राणिनां पीडनं **हिंसा**, न हिंसा **अहिंसा**—( न. स. ) प्राण्यांस न दुखविणें. Harmlessness. **क्षांतिः**—क्षमाशीलता. Forgiveness. ऋजोः भावः **आर्जवम्**—मनाचा सरळपणा. Rectitude. आचार्यस्य उपासनं-सेवनं-(ष.त.स.) **आचार्योपासनम्**-गुरुसेवा. Service of the preceptor. शुचेर्भावः कर्म वा **शौचम्**—शारीरिक व मानसिक पावित्र्य. Purity of both the body and the mind. स्थिरस्य भावः **स्थैर्यम्**-निश्चय, निग्रह, नेट.

Steadfastness. विशेषेण नितांतम् गृह्यते अनेन इति **विनिग्रहः**—संयमन. Control. आत्मनः विनिग्रहः (ष.त.) **आत्मविनिग्रहः**-आत्मसंयमन. Self-control.

**अन्वयः**—अमानित्वं, अदंभित्वं, अहिंसा, क्षांतिः आर्जवं, आचार्योपासनं, ( शरीरमनसोः ) शौचम्, स्थैर्यं आत्मविग्रहः च ( एतानि ज्ञानलक्षणानि कथ्यन्ते )।

**अर्थः**—आत्मस्तुति व ढोंग न करणें, प्राण्यांस न दुखविणें; सहनशीलता, सरळपणा, गुरुसेवा, शरीर व मन यांचें पावित्र्य, निश्चयी स्वभाव, आणि मनोनिग्रह या गुणांचा ज्ञानांत समावेश होतो. ७

Absence of vanity, unpretentiousness, harmlessness, forgiveness, rectitude, service of the preceptor, purity of both body and mind, steadfastness and self-control these qualities are included in knowledge. 7

**मानाभावस्तथा दंभहिंसादिपरिवर्जनम्।** —अरण्य. ४-३१.
**अहिंसा सत्यवचनं सर्वभूतेषु चार्जवम्।**
**क्षमा चैवाप्रमादश्च यस्यैते स सुखी भवेत्॥**—भा. १२-२१५-६.
**उपनीय तु यः शिष्यं वेदमध्यापयेद्द्विजः।**
**संकल्पं सरहस्यं च तमाचार्यं प्रचक्षते॥** —मनु. २-१४०.

*" Humble love,*
*And not proud reason, keeps the door of Heaven!*
*Love finds admission where proud science fails."* —*Young.*
*" The fear of the Lord is the beginning of knowledge."*
—*Proverbs*

९९. **इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च।**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम्॥ ८॥**

इन्द्रियाणां अर्थाः-दृष्टादृष्टभोगाः-( ष. त. स. ), **इंद्रियार्थाः**—इंद्रियांचे भोग, विषय. Objects of the senses. तेषु इन्द्रियार्थेषु विगतः रागः ( प्रेम Love ) यस्मात् सः **विरागः**, विरागस्य भावः **वैराग्यम्**—सुखोपभोगांविषयीं निरिच्छा; विरक्तता, उदासीनता. Indifference or dispassion towards the objects of senses. अहं करोमि इति भावः **अहंकारः**, न अहंकारः **अनहंकारः**—निराभिमान. Absence of egoism. जन्म च मृत्युः च जरा च व्याधयः च दुःखानि च तेषां

समाहारः **जन्ममृत्युजराव्याधिदुःखम्** ( समा. द्वं. ); दोषस्य अनुदर्शनम् ( ष. त. ) **दोषानुदर्शनम्** ; जन्ममृत्युजराव्याधिदुःखेषु दोषानुदर्शनम् ( सप्त. त. स. ) **जन्ममृत्यु-जराव्याधिदुःखदोषानुदर्शनम्**—जन्म, मरण, म्हातारपण, व्याधि व प्रापंचिक दुःखें यांच्या ठिकाणीं दृषैकदृष्टि असणें. The understanding of the evils of birth, death, old age, sickness, and worldly troubles. जीर्यन्ते अंगानि यस्यां अवस्थायां सा **जरा**—म्हातारपण. Old age. **व्याधिः**—आजार. Sickness. **अनुदर्शनम्**—पाहणें, मानणें, जाणणें. Perception, understanding, thinking, regard.

**अन्वयः**—इन्द्रियार्थेषु वैराग्यं, अनहंकारः एव च, जन्ममृत्यु-जराव्याधिदुःख-दोषानुदर्शनम् ( च एतानि ज्ञानलक्षणानि इति गण्यन्ते ) ।

**अर्थः**—इंद्रियांचे जे सुखोपभोग त्यांविषयीं पूर्ण निरिच्छ, निरभिमानी वृत्ति, तसेंच, जन्म, मरण, म्हातारपण, आधिव्याधि, आणि आयुष्यांतील दुःखें, हे जणूं आपल्या मागें लागलेले मोठे दोषच आहेत अशी भावना असणें, याला ज्ञान असें म्हणतात. ८

Indifference towards the objects of senses, absence of egoism, and also the perception of the evils of birth, death, old age, sickness and pain-worldly troubles—these virtues denote knowledge

**इंद्रियोत्तमरोगाणां भोगाशावर्जनादृते ।**
**नौषधानि न तीर्थानि न च मन्त्राश्च शान्तये** ॥–यो. ७-६-४५.

*" Zeal then, not charity, became the guide,*
*And hell was built on spite, and heaven on pride. "* —*Pope.*
*" Death hath a thousand door to let out life. "* —*Massinger.*

**१००. असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥**

न सक्तिः **असक्तिः**—कार्यांत अपेक्षा न ठेवणें; कर्मफलावर अवलंबून नसणें. Free from attachment towards the fruit of an action. स्नेहः सक्तिः स एवातिपक्वोऽभिष्वंग उच्यते—इति **अभिधानम्** . **अभिष्वंगः**-(अभि + स्वञ्ज्) प्रेम, आसक्ति, संबंध. Love, attachment, contact. न अभिष्वंगः **अन-भिष्वंगः**—आत्यंतिक प्रेमाचा अभाव; लंपट न होणें. Absence of intense

affection or love. दारयन्ति भ्रातॄन् इति **दाराः**—( नेहमीं अने., समासांत **दार.** Usually pl., in compound **दार.** )—स्त्री. A wife. पुत्राःच दाराःच **गृहं** च इत्यादीनां समाहारः **पुत्रदारगृहादि** ( समा. द्वं. ), तेषु पुत्रदारगृहादिषु. समं च तत् चित्तं च **समचित्तम्** ( क. धा. ), तस्य भावः **समचित्तत्वम्**—मनाची समता राखणें; इष्ट प्राप्तीनें आनंद, किंवा अनिष्ट गोष्टीनें दुःख न मानणें. Balance of mind either in prosperity or adversity. **इष्ट**—( भू. धा. वि. *p. p.* of **इष्** ६ प. इच्छिणें. 6 P. to wish, desire.) इच्छिलेलें. Wished for, desired. **अन् + इष्ट**—न इच्छिलेलें; इच्छेविरुद्ध. Unwished untoward happening. **उपपत्तिः**—प्राप्ति, गोष्ट, घटना. Happening; event; thing.

**अन्वयः**—( कर्मणि ) असक्तिः, पुत्रदारगृहादिषु अनभिष्वंगः, इष्ट-अनिष्ट-उपपत्तिषु नित्यं समचित्तत्वम् च ( एतानि ज्ञानलक्षणानि कथ्यन्ते ) ।

**अर्थः**—कर्मफलाविषयीं अपेक्षा न बाळगणें; मुलगा-बायको-घरदार इत्यादि बाबतात मायामोहामुळें लंपट न होणें; आणि इच्छित गोष्टींबद्दल आनंद किंवा अनिष्ट प्रसंगाबद्दल खेद न मानितां मनाची समता राखणें, या गुणांचा ज्ञानांत अंतर्भाव होतो. ९

Unattachment to the fruit of actions undertaken; absence of intense affection towards son, wife, home and the rest; and constant evenness of mind in wished-for and unwished-for happenings,-these qualities are declared to be the knowledge. 9

**वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः ।**
**ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले परामृतात्परिमुच्यन्ति सर्वे ॥**

—इति श्रुतिः

**अलं हर्षविषादाभ्यां शुभाशुभफलोदये ।**
**विधात्रा विहितं यद्यत्तदलंघ्यं सुरासुरैः ॥** —अयो. ६-११.

*" Calamity*
*Is man's true touchstone."* —*Beaumont and Fletcher.*

*" He is not valiant that dares die,*
*But he that boldly bears calamity."* —*Massinger.*

*" Prosperity doth best discover vice; but adversity doth best discover virtue."* —*Bacon.*

*" Man approacheth so much the nearer unto God, the farther he retireth from all earthly comfort."–T. A. Kempis-Imitation of Christ.*

**१०१. मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥**

न अन्यः अनन्यः ( न. स. ), अनन्यः च असौ योगःच ( क. धा. स. ), तेन **अनन्ययोगेन**—एकनिष्ठ भावनेनें. Having no other objects in mind except the one. विविधेषु अभिचरणं शीलं अस्याः सा **व्यभिचारिणी**, न व्यभिचारिणी **अव्यभिचारिणी**—चंचल नसणारी, स्थिर, अढळ ( भक्ति ). Not going asrtay, true and faithful ( devotion ). देवता-गृह-तृणकूट, वल्मीक-वृक्षमूल-कुलालशाला-अग्निहोत्र-नदीपुलिन-गिरिकुहर-कंदर-कोटर-निर्झर — स्थंडिलेषु अनिकेतवासः इति **विविक्तदेश-सेवित्वम्**—इति श्रुतिः-विविक्तः च असौ देशःच ( क. धा. ), विविक्तदेशं सेवितुं शीलं अस्य इति **विविक्तदेशसेवी**, तस्य स्वभावः **विविक्तदेशसेवित्वम्**—एकांत प्रदेशीं वास्तव्य करणें. Resort to a lonely or solitary place. **रतिः**—प्रीति, आवड. Liking. **अरतिः**—कंटाळा. Dislike, disgust. जनानां संसद् ( ष. त. ) **जनसंसद्**—प्राकृत किंवा सामान्य लोकांचा समुदाय,चवाटा. The gathering of ordinary people, the masses.

**अन्वयः**—मयि च अनन्ययोगेन अव्यभिचारिणी भक्तिः, विविक्तदेशसेवित्वम्, जनसंसदि ( च ) अरतिः ( इत्यादि ज्ञानं विज्ञेयम् इति ) ।

**अर्थः**—मजविषयीं एकनिष्ठ व दृढ भक्ति, एकांतवासांत राहणी, आणि(सामान्य) लोकांच्या समुदायांत वावरण्याचा-चवाठ्यावर बसण्याचा कंटाळा या गुणसमुच्चयाला **ज्ञान** असें म्हणतात. १०

Unswerving devotion to Me with no other object in mind, resort to solitude, and dislike for the company of ordinary men ( Gossips )—these are the signs of the true knowledge. 10

**अण्वप्युपाहृतं भक्तैः प्रेम्णा भूर्येव मे भवेत् ।**
**भूर्यप्यभक्तोपहृतं न मे तोषाय कल्पते ॥** —भाग. १०-८१-३.
**विसृज्य सर्वानन्यांश्च मामेवं विश्वतोमुखम् ।**
**भजन्त्यनन्यया भक्त्या तान्मृत्योरतिपारये ॥**—भाग. ३-२५-४०.

*" Solitude is the best nurse of Wisdom. "* —*Stern.*
*" The inward sighs of humble penitence*
*Rise to the ear of Heaven, when pealed hymns*
*Are scatterd with the sounds of common air "*—*Jonna Baillie.*

**१०१. अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥**

आत्मानं अधिकृत्य, आत्मनः संबद्धं, आत्मनि अधिकृतं वा **अध्यात्मम्**—स्वतः-संबंधीं किंवा **आत्म्यासंबंधाचें** तें **अध्यात्म**. Belonging to the self, or concerning the Supreme Spirit. अध्यात्मं च तत् ज्ञानं च (क. धा. स.) **अध्यात्मज्ञाने**—तयोः नित्यत्वम् (ष. त. स.) **अध्यात्मज्ञाननित्यत्वम्**—अध्यात्मज्ञानाचें सातत्य. Perpetuity of the knowledge of Supreme Spirit. तत्त्वस्य ज्ञानं (ष. त.), **तत्त्वज्ञानं**—सत्याचें ज्ञान, तत्त्वबोध. Knowledge of the truth; Philosophy. **अर्थः**—सिद्धांत. Principle. तत्त्वज्ञानस्य अर्थः (ष. त.); तत्त्वज्ञानार्थस्य दर्शनम् (ष. त.) **तत्त्वज्ञानार्थदर्शनम्**—तत्त्वज्ञानाच्या सिद्धान्तांचें अध्ययन. Study of the Principles of Philosophy. **प्रकर्षेण उक्तं**-कथितम् वा **प्रोक्तम्**—विशेषेंकरून म्हटलें आहे. Particularly said-called. **अतः**—अ. याहून दुसरें, यापेक्षां. *ind.* Than this, further or other than this. **अन्यथा**-अ. दुसरें, निराळें. *ind.* Other; otherwise, else.

**अन्वयः**—अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनं च एतत् (उपरि उक्तं सर्वं) **ज्ञानं** इति प्रोक्तम् । यद् अतः अन्यथा (तत्) **अज्ञानं** (इति उक्तं च)।

**अर्थः**—आत्मज्ञानाविषयीं सतत चिंतन व तत्त्वज्ञानाच्या खऱ्या सिद्धांतांचें परिशीलन यांस **ज्ञान** असें म्हटलें आहे. याविरहित बाकीचें सर्व **अज्ञान** होय. ११

Perpetual thinking of the knowledge of the Supreme Spirit and the understanding of the principles of Philosophy are declared to be the Knowledge. Everything other than (or contrary to) this is called Ignorance. 11

**मोक्षस्य न हि वासोऽस्ति न ग्रामान्तरमेव वा ।**
**अज्ञानहृदयग्रंथिनाशो मोक्ष इति स्मृतः ॥** –शिवगी. १३-३२.

*" Philosophy! the great and only heir*
*Of all the human knowledge which has been*
*Unforfeited by man's rebellious sin."* —*Cowley.*

[ प्रकृति व पुरुष यांच्या अस्तित्वाचा हेतु पुढील श्लोकांत सांगितला आहे. The cause of the existence of both the material world and the soul, is explained in the following verse. ]

**१०३. कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥**

**कार्यं**—शरीर. The body. '**शरीरं कार्यमुच्यते**'—इति **अभिधानम्. करणं कारणं** वा—इंद्रिय; साधन. An organ of sense. कर्तुः भावः इति **कर्तृत्वम्**—करणी, उत्पत्ति. Generation. कार्यं च कारणानि च कार्यकारणानि (द्वं. स.), कार्यकारणानाम् कर्तृत्वम् इति **कार्यकारणकर्तृत्वम** (ष. त. स.)—शरीर व इंद्रियें यांचो उत्पत्ति. Production or source of body and organs of senses. **हेतुः**—कारण. Cause. **प्रकृतिः**—सर्व बाह्य सृष्टीच्या उत्पत्तीचें कारण; सत्वं, रजस् व तमस् या त्रिगुणानीं युक्त स्वभाव. Matter, Nature; the original source of the material world, consisting of the three essential qualities: Goodness, passion and ignorance. **उच्यते**—कर्म. व. तृ. ए. *pass.* 3rd sing. of **वच्**—१, २ प. **बोलणें, म्हणणें.** 1. 2 P. to say speak, call. **पुरुषः**—आत्मा. The Soul: spirit. **भोक्तुः** भावः इति **भोक्तृत्वम्**—भोग, उपभोग. Enjoyment.

**अन्वयः**—प्रकृतिः कार्यकारणकर्तृत्वे हेतुः उच्यते । पुरुषः ( तु ) सुखदुःखानाम् भोक्तृत्वे हेतुः उच्यते ।

**अर्थः**—कार्य म्हणजे देह व करण म्हणजे इंद्रियें यांच्या उत्पत्तीला मूळ कारणीभूत म्हटली म्हणजे **प्रकृतिच** असून, सुखदुःखांच्या भोगाला मात्र **पुरुष** ( क्षेत्रज्ञ आत्मा स्वतः कार्यकर्ता नसूनहि ) कारणीभूत म्हटला आहे. २०

The Nature is called the original and material cause of the body and the organs of senses; and the Soul ( though not doer ) is said to be the cause of enjoyments of pleasures and sufferings of pains. 20

**कार्यकारणकर्तृत्वे कारणं प्रकृतिं विदुः ।**
**भोक्तृत्वे सुखदुःखानां पुरुषं प्रकृतेः परम् ॥** –भागवत. ३-२६-८
**कार्यकारणकर्तृत्वे द्रव्यज्ञानक्रियाश्रयाः ।**
**बध्नन्ति नित्यदा मुक्तं मायिनं पुरुषं गुणाः ॥**–भाग. २-५-१९.

*" Art may make a suit of clothes; but Nature must produce a man."* —*Hume.*

*" It is the Soul that sees: the outward eyes*
*Present the object, but the mind descries;*
*And thence delight, disgust or cool indifference rise."*—*Crabbe.*

**१०४. पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान् गुणान् ।**
**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥**

पुरि देहे शेते, पुरा सदा एकरूपेण आस्ते, स्वाज्ञानात्पुरम् उषति वा इति **पुरुषः**—आत्मा. The soul. प. श्लो.९,२३. **प्रकृतिः**—मूळचें, किंवा मूलभूत द्रव्य; निसर्ग. The original source of the material world; the Nature. प्रकृतौ तिष्ठति इति **प्रकृतिस्थः**—प्रकृतींत असलेला Seated in the matter. **हि**—अ, कारण. *ind.* Because. **भुंक्ते**—वर्त. तृ. ए *pre.* 3rd sing. of **भुज्**—७ उ. खाणें; भोगणें. 7 U. to eat; enjoy. प्रकृत्याः जायन्ते इति **प्रकृतिजा**—प्रकृतीपासून झालेले. Born of Nature or Matter. गुणेषु संगः ( सप्त. त. ) **गुणसंगः**—त्रिगुणांशीं संबंध. Attachment to the three essential qualities **योनिः**—जन्मस्थान, गर्भस्थान The womb, the place of birth. सत्याः च असत्याः च ( द्वं. स. ), सत्यासत्याः च अमूः योनयः च **सदसद्योनयः** ( क. धा. ); सदसद्योनिषु जन्मानि **सदसद्योनिजन्मानि** ( स. त. ); तेषु सदसद्योनिजन्मसु.

**अन्वयः**—हि पुरुषः प्रकृतिस्थः ( सन् ) प्रकृतिजान् गुणान् भुङ्क्ते । अस्य ( पुरुषस्य ) गुणसंगः सद्-असद्-योनि-जन्मसु कारणं ( भवति ) ।

**अर्थः**—कारण, **पुरुष प्रकृतीशीं** संबंध ठेवून तिच्यांत असलेल्या ( सत्त्व-रज-तमादि ) त्रिगुणांचा उपभोग घेतो. **पुरुषाचा प्रकृतीशीं** असलेला हा ( बरा-वाईट ) त्रिगुणात्मक संबंधच, पुढें बऱ्या किंवा वाईट योनींत होणाऱ्या त्याच्या जन्मांना कारणीभूत होत असतो. २१

The Soul ( spirit ) residing in the original Matter ( Nature ) experiences the ( three ) qualities born of Nature. Attachment to the qualities ( good or bad ) is the prime cause of his births in good or evil wombs. 21.

**स यथाकामो भवति तत्क्रतुर्भवति ।**
**आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ।** –इति श्रुतिः
**सस्यमिव मर्त्यः पच्यते सस्यमिवाजायते पुनः ।** –कठोपनिषद्

*" For, when the power of imparting joy*
*Is equal to the will, the human soul*
*Requires no other heaven."* —*Shellgy.*

*" Who did sin, this man or his parents, that he shauld born blind."* —*John. IX. 2.*

**१०५. यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् ।**
**क्षेत्र-क्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥**

**यावत्**—जें जें; जितकें तितकें म्हणून; जेवढें. Whatsoever; as many as. **संजायते**—व. तृ. ए. *Pre.* 3rd sing. of **सं+जन्**—४ आ. जन्मणें, उत्पन्न होणें. 4 A. to be born or produced. सतः भावः इति **सत्त्वम्**—जीवमात्र किंवा वस्तुमात्र. Any creature or thing. **स्थावर**—न हलणारें. Immobile. **जंगम**—हलणारें, उचलता येणारें. Mobile. स्थावरं च जंगमंच तेषां समाहारः **स्थावरजंगमम्** ( समा. द्वं. )—जगांतील न हलणाऱ्या व हलणाऱ्या सर्व वस्तु. All things ( immobile and mobile ) in this world. **क्षेत्रम्**—शरीर; शेत. Body; field.

**एतत्क्षेत्रमिति ज्ञेयं देह इत्यभिधीयते ।** —अरण्य. ४-२९.

**क्षेत्रज्ञः**—आत्मा, क्षेत्राला जाणणारा. The soul; the knower of the field. **संयोगः**—( सं+युज् )—मिलाफ, जूट. Union, connection. क्षेत्रं च क्षेत्रज्ञः च **क्षेत्रक्षेत्रज्ञौ** ( द्वं. स. ), क्षेत्रक्षेत्रज्ञयोः संयोगः ( ष. त. स ). तस्मात् **क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्. विद्धि**—आज्ञा. द्वि. ए. *Imp.* 2nd sing. of विद्-२ प. जाणणें. 2 p. to know, learn. भरतेषु भरतानां वा ऋषभः ( श्रेष्ठः ) **भरतर्षभः**—भरतकुलांत श्रेष्ठ **अर्जुन**—Arjuna, the most excellent among the Bharatas. तत्संबुद्धौ हे भरतर्षभ !

**अन्वयः**—हे भरतर्षभ, यावत् किंचित् स्थावर-जंगमम् सत्त्वम्, तत् ( तत् ) क्षेत्र-क्षेत्रज्ञसंयोगात् संजायते ( इति त्वं ) विद्धि ।

**अर्थः**—भरतकुलश्रेष्ठ अर्जुना ! जगांत जी जी म्हणून स्थावर-जंगम वस्तु आपण पाहतों, ती ती प्रत्येक प्रकृति आणि पुरुष ( क्षेत्र व क्षेत्रज्ञ ) यांच्या संयोगानेंच उत्पन्न झाली आहे, हें तूं नक्की समज. २६

O Arjuna, the best among the Bharatas, you do know for certain, that whatever immobile or mobile ( thing or creature ) comes into existence, is from the union between the Body and the Soul ( the field and the knower of the field ). 26

**यथा ह्ययं ज्योतिरात्मा विवस्वानपो भिन्ना बहुरूपोऽनुगच्छन् । उपाधिना क्रियते भेदरूपो देवः क्षेत्रेष्वेवमजोऽयमात्मा ॥** -इति श्रुतिः

जीवात्मनिर्गमे देहमरणस्यात्र दर्शनात् ।
देहातिरिक्त एवात्मेत्याहुर्लोकायताः परे ॥-पंचदशी, चित्र. प्रक.

*" Dear Nature is the kindest mother still;*
*Though always changing in her aspect mild."* —*Byron.*

*" What! know ye not that your body is the temple of the Holy Ghost which is in you, which ye have of God: and you are not your own?"* —*St. paul.*

**१०६. यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥**

**यथा**—अ. जसें, ज्याप्रमाणें. *ind.* As, like, just as, namely. प्रकर्षेण काशयति इति **प्रकाशयति** ( प्र+काश् १ आ. प्रयो. *cause.*) प्रकाशित करितो, शोभवितो. Illuminates, lightens. **कृत्स्नम्**—वि. सर्व, अखिल. *adj.* **All**, the **whole**, entire. लोक्यते असौ **लोकः**—जग, विश्व. The world. ( ९२ श्लोक पहा ). भरतकुलोत्पन्नः भरतकुले जातः वा **भारतः**—अर्जुन. पहा श्लो० ४६.

**अन्वयः**—भारत, यथा एकः रविः इमम् कृत्स्नं लोकं प्रकाशयति तथा क्षेत्री (इदं) कृत्स्नं क्षेत्रं प्रकाशयति ।

**अर्थः**—अर्जुना, ज्याप्रमाणें एकटा सूर्य सर्व जगाला आपल्या तेजानें प्रकाशित करतो, तद्वतच हा आत्मा ( क्षेत्री ) सर्व शरीराला ( क्षेत्रं ) आपल्या तेजानें प्रकाशित करून शोभा देतो. ३३

As only the one Sun illumines the whole earth, O Arjuna, the descendant of Bharatas! so does The Soul (the Lord of fhe field) illuminate the whole Body ( the Field ). 33

सूर्यो यथा सर्वलोकस्य चक्षुर्न लिप्यते चाक्षुषैर्बाह्यदोषैः ।
एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा न लिप्यते लोकदुःखेन बाह्यः ॥
—इति श्रुतिः, नी. टीका

*" The Universal Nature, too strong for the petty nature of the bard, sits on his neck and writes through his hand."*

—*Emerson-History.*

*" Build thee more stately mansions, O my Soul!*
*As the swift seasons roll;*
*Leave thy low vaulted past*
*Let each new temple, nobler than the last,*
*Shut thee from heaven with a dome more vast."*—*O. W. Holms*

---

# अध्याय चवदावा

पुरुषानें प्रकृतीच्या गुणांशीं संबंध ठेविल्यामुळेंच सर्व सृष्ट पदार्थांची उत्पत्ति होते. परंतु प्रकृतीच्या ठायीं असणारे जे सत्त्व-रज-तमादि गुण, त्यांचें ज्ञान होऊन प्रत्येकाचें कार्य समजणें अवश्य आहे. **प्रकृतीच्या** ठायीं असणाऱ्या त्रिगुणात्मक बंधनामुळेंच **पुरुषा**पासून सृष्टिव्यापार व विश्वविस्तार होतो; हें ठसविण्यासाठीं गुणत्रयाचें विशेष विवेचन या अध्यायांत केलें आहे. व म्हणूनच याला **गुणत्रय-विभागयोग** हें नांव दिलें आहे.

**१०७. सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।**
**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥**

**प्रकृतिः**—पंचभूतात्मक व जड अशा विश्वाचें आदिकारण, मूळ. Nature, the original source of the material world. प्रकृतेः ( प्रकृतिः एव वा) संभवः येषां ते (ब. स.) **प्रकृतिसंभवाः**—प्रकृतीपासून उत्पन्न झालेले. Born of Prakriti–the Nature **संभवः**—( सं + भू–१ आ ) उत्पत्ति, जन्म. Birth, production. **निबध्नन्ति**—व. तृ. ब. *pre.* 3rd pl. of **नि + बंध्**—९ प. बांधणें. 9 P. to find, tie, fetter. महान्तौ—आजानुपलंबौ बाहू यस्य सः **महाबाहुः** ( ब. स. )—लांब हातांचा, पराक्रमी, शक्तिमान्. Long-armed, powerful. **देह**.– शरीर. The body. देहः अस्य अस्ति इति **देही** (देहिन्)–देहांत राहणारा, देह धारण करणारा, जीवात्मा. Incarnate, embodied; The Soul. नास्ति व्ययः-विकार यस्य सः ( न. ब. स. ) **अव्ययः**—अविनाशी. Inexhaustible, imperishable.

**अन्वयः**—महाबाहो ! सत्त्वं, रजस्, तमस्, इति प्रकृतिसंभवाः गुणाः देहे अव्ययं देहिनं निबध्नन्ति ।

**अर्थः**—पराक्रमी अर्जुना ( आजानुबाहो ! ) प्रकृतीपासून उत्पन्न झालेले सत्त्व रज आणि तम हे तीन गुण, शरीरांत राहणाऱ्या अविनाशी जीवात्म्याला ( मोह-बंधनांनीं ) जखडून टाकितात. ५

Satwam ( goodness), Rajas (activity for pleasures of life), and Tamas ( darkness or ignorance ) such are the qualities born of Prakriti (the Nature.) O great-armed one ! these three qualities, bind fast the indestructible dweller ( Soul ) in the body ( with illusive ties ). 5

**सत्त्वं रजस्तम इति निर्गुणस्य गुणास्त्रयः ।**
**स्थितिसर्गनिरोधेषु गृहीता मायया विभोः** ॥-भाग.२-५-१८.
**सत्त्वं रजस्तमश्चैव त्रीन्विद्यादात्मनो गुणान् ।**
**यैर्व्याप्येमान्स्थितो भावान्महान्सर्वानशेषतः** ॥ -मनु.१२-२४.

*" From Nature doth emotion come, and moods*
*Of calmness equally are Nature's gift :*
*This is her glory : these two attributes*
*Are sister horns that constitute her strength. "* —*Wordsworth.*
*" By harmony our Souls are sway'd;*
*By harmony the world was made."* —*Granville.*

**१०८. सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।**
**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥**

सम्यक् जायते **संजायते**—( सम्+जन्-४ आ. व. तृ. ए. *pre.* 3rd. sing. ) उत्पन्न होणें. Is born, arises. **प्रमादः**—चूक, निष्काळजीपणा, बेसावधपणा. Carelessness, negligence. **मोहः**—भुरळ, भ्रम. Confusion, delusion. प्रमादः च मोहः च **प्रमादमोहौ** ( द्वं. स. ). **भवतः**—व तृ. द्वि. *pre.* 3rd du. of भू—१ प. क्वचित् आ. असणें, होणें. 1 P. rarely A. to be become. न ज्ञानं **अज्ञानं**—बुद्धीचें जडत्व, कर्तव्याची ओळख नसणें Ignorance.

**अन्वयः**—सत्त्वात् ज्ञानं संजायते, रजसः लोभः एव च । तमसः प्रमादमोहौ भवतः च अज्ञानम् एव ( संजायते ) ।

**अर्थः**—सत्त्वगुणापासून ज्ञान, रजोगुणापासून लोभ, आणि तमोगुणापासून निष्काळजीपणा, भ्रम आणि अज्ञान हीं उत्पन्न होतात. १७

From goodness (Satwa quality) knowledge (of self) is born, and also greed from activity and passion (Rajas-qualily); negligence, delusion and also ignorance are the outcome of darkness (Tamas quality). 17

**सत्त्वं ज्ञानं तमोऽज्ञानं रागद्वेषौ रजः स्मृतम् ।**
**एतद्व्याप्तिमदेतेषां सर्वभूताश्रितं वपुः ॥** -मनु. १२-२६.

*" Ignorance is the curse of God,*
*Knowledge the wing wherewith we fly to Heaven. "*
—*Shakespeare; Henry VI.*

**१०९. गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।**
**जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥**

**अतीत्य**—धा. सा. *Ger.* of अति + इ—२ प. पलीकडे-पार जाणें. **2** P. to go beyond or pass over. देहः अस्य अस्ति इति देही—देहधारी नरः; देहस्य समुद्भवः येभ्यः ते **देहसमुद्भवाः** (त्रिगुणाः) ष. ब. स., सम्यक् उद्भवः **समुद्भवः**—मूळ उत्पत्ति. Origin, production. जन्म च मृत्युः च जरा च **जन्ममृत्युजराः** (द्वं. स.), तेषां दुःखानि (ष. त. स.), तैः **जन्ममृत्युजरादुःखैः**. विशेषण मुक्तः **विमुक्तः** (भू. धा. *p. p.* of वि + मुच्—६ प.)—मुक्त, मोकळा. Freed, liberated. **अमृतम्**—जन्ममृत्युजरारहित्यं-मोक्षं-जन्ममृत्यूचे फेरे नसणें, मोक्ष. Liberated from birth and death rounds, final beatitude. **अश्नुते**—व. तृ. ए. *pre.* 3rd sing. of **अश्**—५ आ. पावणें, पोंचणें, मिळविणें, भोगणें. **4 A.** To reach, go to, arrive at, enjoy.

**अन्वयः**—देही (देहधारी आत्मा) देहसमुद्भवान् एतान् त्रीन् गुणान् अतीत्य जन्ममृत्युजरादुःखैः विमुक्तः (सन्) अमृतम् अश्नुते ।

**अर्थः**—देही म्हणजे देह धारण करणारा आत्मा, देहाला उत्पन्न करणारे जे त्रिगुण, त्यांचें अतिक्रमण करून (त्रिगुणात्मक मायेंतून सुटून), जन्म, मृत्यु, व म्हातारपण यांच्या दगदगींतून मोकळा झाल्यामुळें तो शेवटीं मोक्षपदाला पोचतो. २०

The embodied one (the Soul) having transcended these (body-producing) three qualities (of maya) enjoys final beatitude, being freed from the troubles of birth, death and old age. 20.

**रघुरप्यजद्गुणत्रयं प्रकृतिस्थं समलोष्टकाञ्चनः ।** -रघु. ८-२१.

**द्वावेव चिन्तया मुक्तौ परमानंद आप्लुतौ ।**

**यो विमुग्धो जडो बालो यो गुणेभ्यः परं गतः ॥** भाग. ११-९-४.

*" Comfort is in Heaven; and we are on the Earth,*
*Where nothing lives but crosses, care and grief."*

*—Shakespeare-Richard II.*

---

## अध्याय पंधरावा

सर्व क्षर आणि अक्षर यांच्या पलीकडचा, म्हणजे विनाश व अविनाश यांपासून अलिप्त असा जो त्रिगुणातीत परमेश्वर त्याचें **पुरुषोत्तम** नांवानें वर्णन करितात. या **पुरुषोत्तम** वर्णनालाच **पुरुषोत्तमयोग** असें म्हटलें आहे.

पुरि (देहे) शेते इति **पुरुषः**, पुरुषेषु उत्तमः इति **पुरुषोत्तमः** (स. त.स.)—सर्वश्रेष्ठ (**आत्मा**); विष्णु, कृष्ण. The Highest or Supreme Being (The Soul); an epithet of Vishnu or Krishna. पहा श्लो. ९, २३. १०४.

**११०. निर्मानमोहा जितसंगदोषाः अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।**
**द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥५॥**

मानश्च मोहश्च **मानमोहौ** (द्वं. स.), तौ निर्गतौ येभ्यः ते **निर्मानमोहाः** (ब. स.)—अभिमान व मोह यांविरहित. Free from pride and delusion. **जित**—भू. धा. *p. p.* of **जि-१ प. (परा व वि** उपपदें लागतांना आत्म. Atm. when preceded by परा and वि.)—जिंकणें. To conquer. इंद्रियाणां मनसः च विषयैः सह संसर्गः **संगः**—मन व इंद्रियें यांचा ऐहिक वस्तुशीं संबंध. Attachment of organs of senses, and of the mind to the worldly affairs. **संगः** एव **दोषः** (क. धा. स.), जितः संगदोषः यैः ते **जितसंगदोषाः** (ब. स.), आत्मनः संबद्धं, आत्मनि अधिकृतं, आत्मानं अधिकृत्य वा, इति **अध्यात्मम्—स्वतःसंबंधीं, किंवा** आत्म्याविषयीं. Concerning the self or the Soul—आत्मनियतज्ञानम्. पहा श्लो. १०२. **नित्यम्**—(समासांतीं at the end of a com. **नित्य**)—सतत गुंतलेलें, **मग्न**. Constantly dwelling in, busy with. अध्यात्मे नित्याः (**सप्त. त. स.**) **अध्यात्मनित्याः**—आत्मविचारांत सदा गढून गेलेले. Engaged or engrossed in constant thinking of The Soul. **काम्यन्ते**

विषया: एभिः इति कामाः,विशेषतः विशेषेण वा निवृत्ताः कामाः येषां ते विनिवृत्तकामाः-(ष.ब.स.) *cf.* त्यक्तसर्वपरिग्रहाः—ज्यांच्या मनांतील इच्छा अगर वासना नाहींशा झाल्या आहेत ते. Those whose desires are vanished or gone. **द्वन्द्वं**—जोडी; परस्परविरुद्ध स्थिति किंवा गुण यांची जोडी. A pair; a couple of opposite conditions or qualities, such as सुखं and दुःखं, शीतं and उष्णं. विशेषण मुक्तः **विमुक्त**—भू-धा. *p. p* of **वि+मुच्**—६ प. मोकळें-सुटे करणें. 6 P. to free, untie. सुखं च दुःखं च **सुखदुःखं**—(द्वं. स.), सुखदुःखे संज्ञा येषां तानि **सुखदुःखसंज्ञानि** (ष.ब.स.), तैः **सुखदुःखसंज्ञैः** ( **द्वन्द्वैः** ) **संज्ञा**—नांव, नामाभिधान. Name, named. न मूढः **अमूढः**—शहाणा. The wise.

**अन्वयः**—निर्मानमोहाः, जितसंगदोषाः, अध्यात्मनित्याः, विनिवृत्तकामाः, सुखदुःखसंज्ञैः द्वन्द्वैः विमुक्ताः अमूढाः तत् अव्ययम् पदं गच्छन्ति ।

**अर्थः**—ज्यांचा दुरभिमान व मोह हे नाहींसे झालेले आहेत, ज्यांनीं ऐहिक सुखाविषयींची लालसा जिंकली आहे, जे अध्यात्मविचारांत सतत गढून गेलेले आहेत, ज्यांच्या काम-वासना पार मावळल्या आहेत आणि जे सुखदुःखादि द्वंद्वापासून मुक्त ( अलिप्त ) झालेले आहेत, तेच ज्ञानी पुरुष अक्षय्य पदाला ( स्थितप्रज्ञतेला ) पोहोंचतात. ५

Those who are free from pride and delusion, who have conquered the vice of worldly attachments, who are constantly devoted to the Supreme Spirit and who have abandoned their desires, and are freed from the pairs of opposites, known as pleasure and pain, go undeluded to the final emancipation, a place that experiences no change and is ever imperishable. 5

**पराञ्चि खानि व्यतृणत्स्वयंभूस्तस्मात्पराङ्पश्यति नांतरात्मन् । कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षदावृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन् ॥**

—कठोपनिषद् २–१–१.

*" The Providence of Heaven*
*Has some peculiar blessing given*
*To each allotted state below."*

—*Akenside.*

*" Where imperfection ceaseth, heaven begins.*
*Where sin ends, bliss."*

—*P. J. Bailey.*

**१११. यस्मात् क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।**
**अतोस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥**

**यस्मात्**—( पं. ए. abl. sing. of **यद्** सर्वनाम *pron.* **यः** पु.. **या** स्त्री., **यत्-द्** न. ) ज्याअर्थी. Whereas, since. **क्षरम्**—नाशवंत. Perishable. **अतीतः**—( भू. धा. *p. p.* of **अति+इ**-२ प. पार-पलीकडे जाणें, मागें टाकणें. 2 P. to go beyond; pass on, or over. ) अतिक्रमण केलेलें, मागें टाकलेलें. Gone beyond or crossed. **अतः**-म्हणून, ज्या अर्थी. Therefore, since. **लोकः**-पहा श्लोक १२. **वेदः**-ज्ञान; पवित्रज्ञान-विद्या; हिंदूंचे ४ पवित्र धर्म-ग्रंथ. Knowledge; sacred knowledge or learning; holy scriptures of the Hindus: **ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद** and **अथर्ववेद. प्रथितः**—( भू. धा. वि. *p. p* of प्रथ्-१ आ. सुप्रसिद्ध होणें. 1 A. to become famous.) प्रसिद्ध. Well-known, proclaimed.

**अन्वयः**—यस्मात् अहम् क्षरम् अतीतः, अपि च अक्षरात् उत्तमः, अतः अहं लोके वेदे च **पुरुषोत्तमः** ( इति ) प्रसिद्धः ( अस्मि ) ।

**अर्थः**—ज्याअर्थी **मीं** क्षराचें अतिक्रमण केलें असून अक्षराहूनहि उत्तम आहें, त्याअर्थी **मी** सर्व लोकांमध्यें व वेदांमध्यें **पुरुषोत्तम** या नांवानें प्रसिद्ध आहें. १८

Since I am beyond the perishable and Superior to even the imperishable, I am well-known in the world and in the Vedâs as the Supreme Being. 18

**हरिर्यथैकः पुरुषोत्तमः स्मृतो महेश्वरस्त्र्यंबक एव नापरः ।**
**अंशावतारं पुरुषोत्तमस्य ह्यनादिमध्यान्तमजस्य विष्णोः ।**

—इति स्मृतिः

*"The Universe is but one vast symbol of God."* —*Carlyle.*

*"What can 'scape the eye*
*Of God, all-seeing, or deceive His heart*
*Omniscient?"* —*Milton.*

*"There is none good but one, that is God!"* —*Mark X.18.*

---

# अध्याय सोळावा



आपण व्यवहारांत जिला संपत्ती किंवा आयुष्यांतील सामग्री म्हणून समजतों तिचे संपादनावरून दोन प्रकार होतात. एक **दैवी संपत्ति** व दुसरी **आसुरी संपत्ति.** दैवी संपत्तींत सात्त्विक, पवित्र, न्याय्य आणि धर्मशुद्ध विहित आचरणाचा व कृतींचा समावेश होतो. आणि आसुरी संपत्तींत तामसी, अन्याय्य, अपवित्र व अधार्मिक वागणुकीचा आणि कृत्यांचा अंतर्भाव होतो. या अध्यायांत वरील दोन्ही संपत्तींचा विचार केला असल्यानें याला **दैवासुरसंपद्विभागयोग** म्हटलें आहे.

[ दैवी संपत्तीचे गुण व लक्षणें पुढील तीन श्लोकांत सांगितलीं आहेत. In the following three verses the Divine Properties are defined. ]

**११२. अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।**
**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥**

बिभेति अस्मात् इति **भयम्**, न भयम् **अभयम्** ( न. स. )—निर्भयपणा. Fearlessnes. सत्त्वस्य सम्यक् शुद्धिः ( ष. त. ) **सत्त्वसंशुद्धिः**—अंतःकरणाची निर्मलता. Purity of mind. ज्ञानं च योगः च **ज्ञानयोगौ** ( द्वं. स. ), तयोः व्यवस्थितिः **ज्ञानयोगव्यवस्थितिः** ( ष. त. स. ) अथवा **ज्ञानयोगयोः विशेषेण अवस्थितिः** ( म. त. )—ज्ञान आणि कर्मयोग यांच्या ठिकाणीं अढळ निष्ठा. Constant steadfastness in knowledge ( of soul and spirit ) and performance of Action. दीयते इति **दानं** ( न्यायार्जितधनस्य पात्रे प्रतिपादनम्—**रामानुजः** )—न्यायार्जित धनाचा भाग योग्य व्यक्तीला अर्पण करणें. Alms-giving out of the riches honestly earned to the fit persons. दम्यन्ते इंद्रियाणि अनेन इति **दमः** ( **निग्रहो बाह्यवृत्तीनां दम इत्यभिधीयते ।** )—आत्मसंयमन. Self-control. इज्यते अनेन इति **यज्ञः**—होम, **हवन; समर्पण.** Sacrifice, oblation. यज्ञ पांच प्रकारचे आहेत. There are five kinds of sacrificial rites. भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ, and ब्रह्मयज्ञ. पहा श्लो. ३५. सुष्ठु अधीयते अस्मिन् इति **स्वाध्यायः** ( सु + अध्यायः )—वेदाभ्यास, वेदाध्ययन. Study of the Vedas or of the scriptures. तप्यते इति **तपः**—तप ( कायिक, वाचिक and मानसिक ). Austerity. ऋजोः भावः **आर्जवम्**—मनाचा सरळपणा. Straightforwardness.

**अन्वयः**—अभयं, सत्त्वसंशुद्धिः, ज्ञानयोगव्यवस्थितिः, दानं, दमः च, यज्ञः च स्वाध्यायः, तपः, आर्जवं च ( एते गुणाः दैवीं संपदम् अभिजातस्य भवन्ति )

**अर्थः**—निर्भयपणा, अंतकरणशुद्धि, ज्ञान व कर्म यांच्या ठायीं अढळ निष्ठा, ( योग्य पात्रीं ) दानधर्म, इंद्रियदमन, स्वार्थत्यागरूपी यज्ञ, वेदाभ्यास, ( त्रिविध ) तपाचरण, आणि मनाचा सरळपणा हे दैवी संपत्तीच्या मनुष्याचे गुण होत. १

Fearlessness, purity of mind, steadfastness in knowledge and duty, almsgiving ( to the fit persons ), self-restraint, sacrifice, study of the scriptures, austerity ( of three kinds ) and straightforwardness-these are the virtues belonging to the person born of the Divine Nature. 1

**स्वाध्यायेन व्रतैर्होमैस्त्रैविद्येनेज्यया सुतैः ।**
**महायज्ञैश्च यज्ञैश्च ब्राह्मीयं क्रियते तनुः ॥** —मनु. २-२८.
**अष्टौ गुणाः पुरुषं दीपयन्ति, प्रज्ञा च कौल्यं च दमः श्रुतं च ।**
**पराक्रमश्चाबहुभाषिता च, दानं यथाशक्ति कृतज्ञता च ॥**
—भार. उद्यो. ३३-१०४.
**यथा चतुर्भिः कनकं परीक्ष्यते निघर्षणच्छेदनतापताडणैः ।**
**तथा चतुर्भिः पुरुषः परीक्ष्यते दानेन शीलेन गुणेन कर्मणा ॥**
—भर्तृहरिः

*" By contenting ourselves with obedience we become Divine. "*
—*Emerson.*

*" Alms are but the vehicles of prayer. "* —*Dryden.*

*" Withhold not good from them to whom it is due, when it is in the power of thine hand to do it. Say not unto thy neighbour, Go and come again, and to-morrow I will give; when thou hast it by thee. "* —*Proverbs. III. 27-28.*

**११३. अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ।**
**दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥**

हिंस्यन्ते सत्त्वानि अस्यां इति हिंसा, न हिंसा अहिंसा ( न. स )—विचार, उच्चार किंवा आचार यांयोगें प्राण्यांस पीडा न देणें. Abstaining from giving troubles to creatures by thought, word or deed; harmlessness. **सत्यम्**—खरेपणा. The truth. न क्रोधः अक्रोधः ( न. स. )—न रागावणें. Absence of wrath. **त्यागः** ( त्यज्-१ प. टाकणें, सोडणें, अर्पिणें, देणें. 1 P. to leave, give up, surrender, distribute )—औदार्य. Giving in

charity. **पिशुनः**-निंदक. A slanderer. पिशुनस्य भावः **पैशुनम्**—निंदा. Slander. न पैशुनम् **अपैशुनम्**—दुष्टपणाचा अभाव. Absence of roguery or wickedness. लोलुभस्य लोलुपस्य वा भावः **लोलुप्त्वम्**, न लोलुप्त्वम् **अलोलुप्त्वम्** (न. स.)—लोभ-आसक्ति न टेवणें. Uncovetousness. मृदोः भावः **मार्दवम्**—सौम्यपणा, मृदुता. Mildness. **ह्रीः**—लाज, नम्रता. Shame, modesty. चपलस्य भावः **चापलम्**, न चापलम् **अचापलम्** (न. स.)—धिमेपणा, धिम्माई. Absence of fickleness.

**अन्वयः**—अहिंसा, सत्यम्, अक्रोधः, त्यागः, शान्तिः, अपैशुनम्, भूतेषु दया, अलोलुप्त्वं, मार्दवं, ह्रीः, अचापलं च (एते दैवीं संपदम् अभिजातस्य गुणाः भवन्ति)।

**अर्थः**—प्राणिमात्रास (कोणत्याहि मार्गानें) पीडा न देणें, सत्य भाषण करणें, न रागावणें, औदार्य (फलत्याग), शांति धरणें, दुष्टावा वा चहाडी न करणें, प्राणिमात्रावर दया असणें, लोभानें मोहित न होणें, मनाचा सौम्यपणा, (दुष्कृत्यांबद्दल) लज्जा वाटणें व (इंद्रियांचें) अयोग्य व्यापार सुटणें, हे दैवी संपत्तीच्या पुरुषाचे सद्गुण होत. २

Non-violence (abstaining from troubling creatures by any way), truth, absence of wrath, renunciation (of fruit), peacefulness, absence of slander or wickedness, compassion for all creatures, uncovetousness, mildness of heart, shame (for sinful actions) and absence of fickleness--these qualities belong to the person born of the Divine Nature. 2

**अदत्तस्यानुपादानं दानमध्ययनं तपः।**
**अहिंसा सत्यमक्रोध इज्या धर्मस्य लक्षणम्॥**

—भार. शां. ३६-१०.

**अथ यत्तपो दानमार्जवमहिंसा सत्यवचनमिति ता अस्य दक्षिणाः** —छांदोग्य उ. ३-१७-४

**अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः।**
**दानं दमो दया शान्तिः सर्वेषां धर्मसाधनम्॥**—याज्ञवल्क्य-स्मृतिः

*"Violent delight have violent ends,*
*And in their triumphs, die; like fire and powder.*
*Which as they kiss, consume."* —*Shakespeare.*

*"Truth is the highest thing that man may keep."* —*Chaucer.*

*"Truth crushed to earth shall rise again;*
*The eternal years of God are hers;*
*But error wounded writhes in pain,*
*And dies among her worshippers."* —*Bryant.*

**११४. तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।**
**भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥**

दुर्जनैः अनभिभवनीयत्वम् **तेजः—रामानुजः**; बुद्धेः सूक्ष्मता प्रकाशाधिक्यं वा **तेजः—शंकरानन्दी टीका**; तेजः—विशिष्ट सामर्थ्य. Heroic lustre; dignity; spirit. क्षम्यन्ते अपराधिनः अनया इति **क्षमा—**सोशिकपणा, **सहनशीलता.** Forgiveness. ध्रियन्ते प्राणेंद्रियादयः यया सा **धृतिः—**धैर्य. Fortitude. शुचेः भाव **शौचम्**—स्नानादि बाह्यं, भगवत्स्मरणादि आंतरं च—शारीरिक व मानसिक पावित्र्य, शुद्धि. Purity of both body and heart. न द्रोहः **अद्रोह** (न. स.)—द्वेषबुद्धीचा अभाव. Absence of envy or treachery. अत्यर्थं मानः **अतिमानः** (प्रादि. त. स.); अतिमानः विद्यते यस्य सः (ब. स.) **अतिमानी**; तस्य भावः **अतिमानिता**; न अतिमानिता **नातिमानिता**—अहंकार नसणें. Absence of pride or of egoism. **भवन्ति—**व. तृ. ब. *pre.* 3rd pl. of **भू**—१ प. कचित् आ. होणें असणें चे मालकीचें असणें. 1 P. rarely A. to become, be; to have; to belong to. **संपदम्**-द्वि. ए., acc. sing. of **संपद्**-वैभव, संपत्ति. Prosperity, wealth देवस्य इयं इति **दैवी**—सत्त्वप्रधान, देवविषयक. Divine. **अभिजातः**—भू. धा. वि. *p. p.* of **अभि + जन्**—४ आ. एकाद्या वस्तुसाठीं-व्यक्तीसाठीं-जन्मसिद्ध हक्क सांगण्यासाठीं-जन्मास येणें 4 A. to be born to, or for (a thing or person), or to claim as one's birth-right. **अभिजातः**—कुलीन पुरुष, जन्मजात. A man of noble descent; inborn.

**अन्वयः**—भारत ! तेजः क्षमा, धृतिः, शौचम्, अद्रोहः, नातिमानिता च (एते गुणाः) दैवीं संपदम् अभिजातस्य भवन्ति ।

**अर्थः**—अर्जुना ! पाणीदारपणा, (वैऱ्याच्याहि) अपराधाची क्षमा, धैर्य, अंतर्बाह्य पावित्र्य, शत्रुत्व न साधणें, व दुरभिमान न बाळगणें, हे वर सांगितलेले गुण दैवी संपत्तीस अनुसरून जन्मलेल्या पुरुषाचे होत. ३

O Arjuna, the descendant of Bharat family! dignity, forgiveness, courage, (physical and mental) purity, absence

of hatred and self-praise, these (above mentioned) virtues belong to the person born with Divine properties. 3

**क्षत्रियाणां बलं तेजो ब्राह्मणानां बलम् क्षमा ।**
—भार. आदि. १७५-२९.

**अद्रोहः सर्वभूतेषु कर्मणा मनसा गिरा ।**
**अनुग्रहश्च दानं च शीलमेतत्प्रशस्यते ॥** -भा. शांति. १२४-६६.

**वयोरूपविभूतीनामेकैकं मदकारणम् ।**
**तानि तस्मिन्समस्तानि न तस्योत्सिषिचे मनः॥**-रघु.१७-४३.

"*None but the brave deserves the fair.*" —*Dryden.*

"*The brave only know how to forgive.*" —*Sterne*

"*True dignity is his whose tranquil mind*
*Virtue has raised above the things below;*
*Who, every hope and fear to Heven resign'd,*
*Shrinks not, though Fortune aims her deadliest blow.*"
—*Beattie.*

[ खालील श्लोकांत आसुरी संपत्तीचें लक्षण दिलें आहे. In the following verse the Demoniacal Properties are defined. ]

**११५. दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेवच ।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥**

**दंभः**—ढोंग. Hypocrisy. 'धार्मिकत्वख्यापनाय धर्मानुष्ठानम् इति **दंभः**—**रामानुजः**. दृप्यते अनेन इति **दर्पः**—विद्यरूपकुलधनकर्मादि-निमित्तः चित्तोद्रेकः सतामवमानहेतुः इति **दर्पः—शंकरानंदी टीका**-गर्व. Arrogance. अभिनः मानः **अभिमानः**—पोकळ डौल. Self-conceit. **परुष**—वि. कटोर, कटु, कठीण निर्दय. *a.* Harsh, hard, cruel, abusive. परुषस्य भावः **पारुष्यम्**—लावून किंवा टोचून कठोर भाषण करणें. Abusive or insulting word or deed; harshness; taunt. न ज्ञानं **अज्ञानं**—अविवेक, अविचार. Unwisdom, imprudence; ignorance. पृथायाः पुत्रः ( अपत्यं पुमान् वा ) **पार्थः**—अर्जुन. **असुरः**—राक्षस. A demon. असुराणां इयं इति **आसुरी**—राक्षसी. Demoniacal.

**अन्वयः**—हे पार्थ ! दंभः, दर्पः च अभिमानः, क्रोधः पारुष्यं, एव च अज्ञानं ( एते दुर्गुणाः ) आसुरीं संपदं अभिजातस्य भवन्ति,

**अर्थः**—अर्जुना ! ढोंग, गर्व, वृथाभिमान, राग, कठोर व टोचून भाषण, आणि अडाणीपणा हे दुर्गुण **आसुरी** संपत्तीच्या मनुष्याचे होत. ४

Hypocrisy, vanity, self-conceit, wrath, harshness ( in word and deed ), and ignorance-these ( evil ) qualities, O Arjuna, the son Prithâ ! belong to a man who is born with demoniacal properties. 4

जरा रूपं हरति हि धैर्यमाशा । मृत्युः प्राणान्धर्मचर्यामसूया ।
क्रोधः श्रियं शीलमनार्यसेवा । ह्रियं कामः सर्वमेवाभिमानः ॥

–उद्यो. ३५-५०.

यत्सानुबन्धेऽसति देहगेहे ममाहमित्यूढदुराग्रहाणाम् ।
पुंसां सुदूरं वसतोऽपि पुर्यां भजेम तत्ते भगवन्पदाब्जम् ॥

–भाग. ३-५-४३.

*" If there is a sin more deeply black than others,*
*Distinguished from the list of common crimes,*
*A legion in itself, and doubly dear*
*To the dark prince of hell, it is–Hypocrisy. "* —*Hannsh More.*
*" It is an old maxim of the schools,*
*That Vanity is the food of fools. "* —*Swift.*
*" Anger is like*
*A full-hot horse: who being allowed his way,*
*Soft mettle tires him. "* —*Shakespeare–Henry VIII.*

[ दैवी व आसुरी संपत्तीचे परिणाम. The effects of both the properties ].

१**१६. दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता ।**
**मा शुचः संपदं दैवीमभिजातोसि पांडव ॥ ५ ॥**

विशिष्टः मोक्षः **विमोक्षः**––( वि + मुच्—६ प. ) मुक्ति, मोक्ष. Liberation, final emancipation. नियतः बंधः **निबंधः** ( नि + बंध्–९ प. )—बंधन, बांध, बांधणें. Attachment, fettering. **मता**—( भू. धा. *p. p.* मन्—१ प. पूजणें. To worship. ४, ८ आ. **मानणें**. 4, 8. to think, *Believe.* १० आ. गर्विष्ठ असणें. 10 A. to be proud. )—मानलेली. Deemed, thought, considered. **मा**—नकारार्थी अव्यय. बहुधाः आज्ञार्थाशीं जोडून क्रियापदापूर्वी येतें. A particle of prohibition (rarely of negation.) Usually comes before the Imperative. पहा श्लो. १९, १४१. **अशुचः**—सा. भू. द्वि. ए. Aor. 2nd sing. of **शुच्**—१ प. शोक करणें. 1 P. to bewail, mourn.

**अन्वयः**—पांडव ! दैवी संपत् विमोक्षाय, आसुरी ( संपत् च ) निबंधाय मता। ( त्वं ) दैवीं संपदं अभिजातः असि । मा (अ) शुचः ।

**अर्थः**—अर्जुना ! **दैवी** संपत्ति ही शेवटीं मोक्षसुखदायक, आणि आसुरी संपत्ति ही बंधनकारक म्हटली आहे. तूं **दैवी** संपत्तींत जन्माला आला असल्यानें मुळींच शोक करूं नकोस. ५

The Divine properties are said to be for final liberation, and the Demoniacal properties for the bondage ( of rebirths ). Grieve not, therefore, O son of Pându ! for you are born of Divine properties. 5

**वासनातानवं राम मोक्ष इत्युच्यते बुधैः ।**
**पदार्थवासनादार्ढ्यं बन्ध इत्यभिधीयते ॥** —योग. २-२-५.

*" Who breathes must suffer, and who thinks must mourn,*
*And he alone is bleesed who never was born. "* —*Prior.*
*" Heaven punishes the bad, and proves the best. "* —*Dryden.*

**११७. त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥**

त्रयः विधाः यस्य तत् त्रिविधं—तीन प्रकारचें. Triple. नरकः—वाईट स्थिति, दुर्गति. Hell.

१. **नरक** म्हणजे पाताळ लोक. आंग्ल पुराणांत याला **प्लुटोचें राज्य** म्हणतात. पहा श्लोक ३.

२. **नरक** या नांवाचा एक राक्षस होऊन गेला. त्याजबद्दल अशी गोष्ट सांगण्यांत येते कीं, त्यानें हत्तीचें रूप धारण करून, विश्वकर्मा, देव, गंधर्व, व मानव यांच्या मुली व देवांच्या अप्सरा यांस जुलमाने नेऊन बंदिवासांत ठेविलें. त्या १६००० वर होत्या. पुढें देवांच्या विनवणीवरून **कृष्णानें नरकासुरास** मारून त्या सर्व बंदिवासमुक्त स्त्रियांस स्वतःच्या अंतःपुरांत ठेविलें. दुसरी एक गोष्ट सांगतात कीं, **नरकानें अदितीचीं** कर्णभूषणें हिरावून नेलीं ही बातमी देवांस कळल्यावरून त्यांनीं **कृष्णाला** विनंति केली. व कृष्णानें **नरकाचें** पारिपत्य केलें.

1. *Narak,* the infernal regions, corresponding to the realm of Pluto. See under verse 3.

2. Narak was a demon king. One account says that Naraka assumed the form of an elephant and carried off daughters of Vishwakarma, Gods, Gandharvas and men, and the nymphs themselves and kept them in his harem. They were more than 16,000. They were transferred to Krishna's harem when He killed Narak by request of Gods. Another account states that Nature carried off Aditi's ear-rings, and Krishna at the request of Gods killed him in a single combat.]

नाशयति इति **नाशनम्**—नाश करणारें. Destructive. **आत्मनः**—ष. ए. *Gen.* sing of **आत्मन्**—आपण, स्वतः; आत्मा. Self, oneself; the Soul. **कामः**—इच्छा; विषयवासना. Desire; lust **तस्मात्**—त्यासाठीं, म्हणून. Therefore. **त्रयं**—तिहींचा समुदाय. A triad, a group of three. **त्यजेत्**—विध्य. तृ. ए. *pot.* 3rd. sing. of **त्यज्**—१ प. सोडणें, टाकणें, सोडून जाणें. 1 P. to leave, abandon, go away from.

**अन्वयः**—कामः, क्रोधः, तथा लोभः च इदं त्रिविधं आत्मनः नाशनं नरकस्य द्वारं च ( अस्ति ) । तस्मात् एतत्त्रयं त्यजेत् ।

**अर्थः**—काम, क्रोध, लोभ असें तिघांचें हें त्रिकूट आपला नाश करणारें व केवळ नरकाचें दार आहे; म्हणून मनुष्यानें या तिहींचा अजीं त्याग करावा. २१

Lust, wrath and greed—these three form a triple gate of the Hell causing the destruction of the self; and therefore, one should renounce tuis trio. 21

**मानं हित्वा प्रियो भवति क्रोधं हित्वा न शोचति ।**
**कामं हित्वार्थवान्भवति लोभं हित्वा सुखी भवेत् ॥**

—भार. वन. ११३–७८.

**अनित्या शत्रवो बाह्या विप्रकृष्टाश्च ते यतः ।**
**अतः सोऽभ्यन्तरान्नित्यान् षट्पूर्वमजयद्रिपून् ॥**—रघु. १७-४५.

" *Take heed and beware of covetousness.* " —*Luke XII. 15.*

" *The fools we know have their own paradise,*
*The wicked also have their proper Hell.* " —*James thomson.*

**११८. यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥**

शिष्यते अनुशिष्यते अनेन ज्ञातः अर्थः इति **शास्त्रम्**—पवित्र ज्ञान देणारा किंवा धर्माची आज्ञा शिकविणारा ग्रंथ; वेद. A sacred precept or religious treatise; Vedas. विधीयते अपूर्वः अर्थः बोध्यते अनेन इति **विधिः**—धर्मग्रंथांची शिकवणूक, आज्ञा; धार्मिक क्रिया. Commandment; any religions rite or ceremony. शास्त्रस्य विधिः (ष. त स.). **उत्सृज्य**—धा. आ. *Ger.* of **उत् + सृज्**—६ प. सोडणें, टाकणें. 6 P. to abandon, give up. **वर्तते**—व. तृ. ए. *pre.* 3rd sing. of **वृत्**—१ आ. असणें. 1 A. *to be*, exist.; ४ आ. पसंत करणें, आवडणें. 4 A. to choose, like; १० उ. प्रकाशणें. 10 U. to shine. कामस्य कारः (करणं) यथा स्यात् तथा (अव्य. स.) **कामकारतः**—स्वेच्छेप्रमाणें. Acting at will, by indulging in one's own desire. **सिद्धिः**-यशप्राप्ति. Attainment of an object. प.श्लो.७३. **अवाप्नोति**-वर्त. तृ. ए. *pre.* 3rd sing. of **अव + आप्**—५ उ. मिळविणें, साधणें. 5 U. to obtain, secure. **परा**—श्रेष्ठतम. Highest; higher than the highest. **गतिः**—स्थिति; उद्दिष्ट, ध्येय. Position, goal.

**अन्वयः**—यः शास्त्रविधिम् उत्सृज्य कामकारतः वर्तते सः सिद्धिं न अवाप्नोति, सुखं न, परां गतिम् (अपि) न अवाप्नोति ।

**अर्थः**—जो धर्मशास्त्रविहित वागण्याचें सोडून देऊन स्वेच्छाचारानें वाटेल तसा वागतो, त्याला आपल्या कार्यांत यशसिद्धि मिळत नाहीं, सुख नाहीं आणि श्रेष्ठतम गति (मोक्ष) तर नाहींच नाहीं. २३

He who having set aside the sacred teachings of the religion (the scriptures) follows the path of his own desires, attains neither perfection (of his object), nor happiness, nor the Highest goal (Salvation). 23

**इंद्रियाणां प्रसंगेन दोषमच्छत्यसंशयम् ।**
**संनियम्य तु तान्येव सिद्धिमाप्नोति मानवः ॥**–शांति. ३२३-८.

*"Obedience is the bond of rule."* —*Tennyson.*

*"Let a man keep the law–any law–and his way will be strewn with satisfaction."* —*Emerson.*

*"For as many as have sinned without law shall perish without law."* —*Romans II. 12.*

**११९. तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥**

प्रकर्षेण मीयते अनेन इति **प्रमाणम्**—निर्णायक मत, मुख्य आधार, मार्गदर्शक. Authority, guide. **ते**—च. व ष. ए. Dat. & gen. sing. of **युष्मद्**—तूं. Thou. कार्यं च अकार्यं च कार्याकार्ये ( द्वं. स. ), तयोः व्यवस्थितिः ( ष. त. ) **कार्याकार्यव्यवस्थितिः**—कर्तव्य व अकर्तव्य यांचा निर्णय. The determination of what ought to be done and what ought not to be done. तस्यां कार्याकार्यव्यवस्थितौ. **ज्ञात्वा**—भू. धा. अ. *Ger.* of **ज्ञा**—९ उ. जाणणें, शिकणें. 9 U. to know, learn. विशेषेण धीयते अनेन इति **विधानम्**, शास्त्रविधानेन उक्तं इति **शास्त्रविधानोक्तम्**—शास्त्रांतील विधि-निषेधानुरूप. According to the scriptural declaration. **कर्तुम्**—हेतुदर्शक धा. अ. *Inf.* of **कृ** ८ उ. करणें. 8 U. to do. **इह**—या जगांत, येथें. In this world, here. **अर्हसि**—( व. द्वि. ए. *pre.* 2nd sing. of **अर्ह्**—१ प. ) तुला योग्य आहे. It is worthy of your name. You are required to do it. you deserve.

**अन्वयः**—ते कार्याकार्यव्यवस्थितौ शास्त्रं प्रमाणं ( अस्ति )। तस्मात् शास्त्रविधानोक्तम् ( कर्म ) ज्ञात्वा इह ( त्वं ) कर्म कर्तुम् अर्हसि

**अर्थः**—तुझें कर्तव्य कोणतें अगर अकर्तव्य कोणतें, हें निश्चित ठरविण्याच्या बाबतींत मुख्य प्रमाण म्हटलें म्हणजे शास्त्राज्ञाच होय. म्हणून शास्त्राज्ञेप्रमाणें योग्य काय तें जाणून यावेळीं येथें, तुला तें (शास्त्रविहित) कर्म करणेंच अवश्य आहे. २४

The scriptures are the only authority to guide you, in determining what ought to be done and what ought not to be done. Therefore, knowing what has been declared by the commandmends of the scriptures, you are required here ( on this battlefield ) to perform your duty accordingly. 24

**शास्त्रसज्जनसंसर्गैः प्रज्ञां पूर्वं विवर्धयेत् ।**
**सेकसंरक्षणारम्भैः फलप्राप्तौ लतामिव ॥** –योग. –५–१२–२४.

*" Actions are our epochs. "* —*Byron.*

*" Self reverence, self-knowledge, self-control;*
*These three alone lead life to sovereign power.*
*Yet not for power ( power of herself*
*Would come uncalled for ). But to live by Law;*
*Acting the Law we live by without fear. "* —*Tennyson.*

# अध्याय सतरावा

आहार, यज्ञ, दान, तप, आणि ब्रह्माचा नामनिर्देश यांच्या मूळाशीं श्रद्धेची मुख्यतः जरूर असते. परंतु श्रद्धा सर्वत्र सर्वकालीं सारखीच नसून प्रकृतीच्या सत्त्व, रज व तमोगुणानुरूप तिच्यांत फरक असतो. यामुळें श्रद्धेचेहि तीन भाग होतात. या त्रिविध श्रद्धेसंबंधीं विचार या अध्यायांत केला असल्यानें यास **श्रद्धात्रयविभाग-योग** म्हटलें आहे.

**१ श्रद्धा २ आहार ३ यज्ञ ४ दान ५ तप ६ ब्रह्मनिर्देश**

सात्विक. राजसी ताम. सा. रा. ता. सा. रा. ता. सा. रा. ता. सा. रा. ता. ॐ तत् सत्

शारीरतप वाङ्मयतप मानसतप

**१२०. सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥**

सत्त्वेन अनुरूपा ( तृ. त. स. ) सत्त्वानुरूपा—प्रकृतिस्वभावाप्रमाणें. According to one's own inborn disposition or inherent character.

**इंद्रियेभ्यः परं मनः, मनसः सत्त्वमुत्तमम् ( बुद्धिः ) ।**
**सत्त्वादधि महानात्मा महतोऽव्यक्तमुत्तमम् ॥** —कंठ ६–७.

**श्रद्धा**—भक्ति; धार्मिक किंवा दैवी गोष्टींविषयीं विश्वास. Faith, belief in divine or religious matters. श्रद्धा प्राचुर्येण विद्यते यस्मिन् सः **श्रद्धामयः** (सहा.ब.स.)–भक्तिपूर्ण. Full of faith. या श्रद्धा यस्य जीवस्य स· **यच्छ्रद्धः** (ब.स.)

**अन्वयः**—भारत, सर्वस्य श्रद्धा सत्त्वानुरूपा भवति । अयं पुरुषः श्रद्धामयः ( अस्ति ) । यः यच्छ्रद्धः सः एव सः ( भवति ) ।

**अर्थः**—अरे **भरत**कुलोत्पन्न अर्जुना ! सर्व प्राणीमात्रांची श्रद्धा ही त्यांच्या मूळ प्रकृतिस्वभावाला अनुसरून असते. मनुष्यप्राणी हा श्रद्धायुक्त आहे; म्हणून, जशी ज्याची श्रद्धा अथवा विश्वास तसाच तो बनत जातो.- तसेंच त्याला फळ मिळतें. ३

O Arjuna, the descendout of Bharat family, the faith of each living being is shaped according to his own natural

instinct. The man is full of faith; so, what his faith is, that verily he is—he gets the fruit of that nature. 3

**निगमाचार्यवाक्येषु भक्तिः श्रद्धेति विश्रुता । -अपरोक्षानुभूति. ८**
**न दृष्टपूर्वं प्रत्यक्षं परलोक विदुर्बुधाः ।**
**आगमांस्त्वनतिक्रम्य श्रद्धातव्यं बुभूषता ॥ -शांति.२८-४२.**

*" All things whatsoever ye pray and ask for, believe that ye have received them, and ye shall have them." —St. Mark. XI. 24.*

*" And he said unto the woman, Thy faith hath saved thee; go in peace." —S. Luke. 7-50.*

*" Our deeds determine us as much as we determine our deeds." —George Eliot.*

*" None live so easily, so pleasantly, as those that live by faith." —Matthew Henry.*

*" As he thinketh in his heart so is he." —Old Testament.*

*" Man is what he eats." —Fenerbach.*

*" All seems infected that the infected spy.*
*All looks yellow to the jaundiced eye." —Pope.*

**१२१. यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।**
**प्रेतान् भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥ ४ ॥**

**यजन्ते**—यज्-१ उ.—होम-पूजा करितात. Sacrifice, worship. सत्त्वे निष्ठा येषां ते **सात्त्विकाः** ( ष ब. स. )—सत्त्वगुणी किंवा साधुवृत्तीच्या व्यक्ती. Persons endowed with satwa quality or saintly nature. **यक्षः**—कुबेराचा धनपाल, कुबेर. Demigod; Attendant of Kubera; Kubera, the God of riches. **रक्षस्**—राक्षस, दैत्य, देवांचा शत्रु. A Giant, an enemy of Gods. यक्षाः च रक्षांसि च **यक्षरक्षांसि** ( द्वं. स. ). रजसि निष्ठा येषां ते **राजसाः** ( ब. स. )—रजोगुणी किंवा षड्रिपुप्रेरित व्यक्ति. Persons endowed with Rajas quality or passions. **प्रेत**—भू. धा. *p. p.* of प्र+इ—२ प. मरणें, सोडून जाणें. 2 P. to die, depart from. भूतानां गणाः ( ष. त. स.) **भूतगणाः**—पिशाच.समुदाय. Devils, ghosts. तमसि निष्ठा येषां ते **तामसाः** ( ब. स. )—तमोगुणी किंवा अज्ञानी व्यक्ती. Persons endowed with Tamas quality or ignorance.

**अन्वयः**—सात्त्विकाः देवान्, राजसाः च यक्षरक्षांसि यजन्ते । अन्ये तामसाः जनाः प्रेतान् भूतगणान् च यजन्ते ।

**अर्थः**—सात्त्विक मनाचे लोक देवांची व राजस अंतःकरणाचे लोक यक्ष-गंधर्व आणि राक्षस यांची पूजा करितात. व इतर बाकीचे सर्व तामसी लोक मेलेल्या प्राण्यांस व भूत-पिशाच योनींस भजतात. ४

Persons of goodness worship the Gods; the passionate worships the demigods ( Kubera, Gandharva etc. ) and giants; and the others, that is the ignorant folk, worship the disembodied souls of the dead and multitudes of nature spirits. 4

**देवोऽसुरो मनुष्यो वा यक्षो गंधर्व एव च ।**
**भजन्मुकुन्दचरणं स्वस्तिमान् स्याद्यथा वयम् ॥** –भाग.७–७.

*" He that falls into sin is a man; that grieves at it is a saint; that boasteth of it is a devil. "* —*Thos. Fuller.*

*" The power of godliness is the doer of every duty in God's kingdom......for by faith the Lord arises on us, and by this power of godliness His glory is seen upon us. "* —*W. Dell.*

**१११. देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।**
**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥**

प्रकर्षेण जानंति ते **प्राज्ञाः**—शहाणे. The wise. **द्विजः**—द्विजन्मा ब्राह्मण; पहिल्या तीन वर्णांपैकीं कोणीहि मनुष्य. जन्मानंतर मौंजिबंधनाचा विधि झाल्याखेरीज ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांस पूर्णत्व येत नाहीं. जन्म व मौंजि-संस्कार असे दोन जन्म. **Twice born Brahmin; a man of any of the first three castes : Brahman Kshatriya and Vaishya. The ritual thread-ceremony of these three has been necessarily considered as the second birth.**

जन्मना ब्राह्मणो ज्ञेयः ( जन्मना जायते शूद्रः ) संस्कारैर्द्विज उच्यते । देवाः द्विजाः गुरवः प्राज्ञाः च **देवद्विजगुरुप्राज्ञाः** ( द्वं. स. ) तेषां पूजनं ( ष. त. ) शुचेः भावः **शौचम्**—पावित्र्य, शुद्धता. Purity. ब्रह्मणि चर्यं **ब्रह्मचर्यम्**—धार्मिक शिष्यत्व; वेदाभ्यासी विद्यार्थ्यांचा पहिल्या २५ वर्षांचा व पवित्र आचरणाचा जीवनक्रम. **Religious studentship; the life of celibacy to be passed by**

a scholar of Vedas during the period of first 25 years. शरीरस्य इदं इति **शारीरं**—देहविषयक, देहसंबंधीं. Relating to the body. **उच्यते**—कर्म. तृ. ए. *pass.* 3rd sing. of वच् २ प. सांगणें, बोलणें. 2 P. to say, speak.

**अन्वयः**—देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं, शौचम्, आर्जवं, ब्रह्मचर्यं, अहिंसा च ( एतैः गुणैः युक्तं इदम् ) **शारीरं तपः** उच्यते ।

**अर्थः**—देव, ब्राह्मण, वडील माणसें, गुरुजन, विद्वान् यांचा मन्मान राखणें, पवित्र वर्तन व अंतःकरणाचा सरळपणा असणें, ब्रह्मचर्य राखणें व अहिंसा पाळणें इतक्या गुणांच्या समुच्चयाला **शारीर तप**–कायिक तपाचरण–असें म्हणतात.१४

Worship offered to Gods, to the twice born ( Brahmins ), to the elderly persons, teachers, and to the wise; purity, straightforwardness, life of celibacy and harmlessness are said to be ( these qualities form ) *the austerities of the body.* 14

**यदिदं ब्रह्मणो रूपं ब्रह्मचर्यमिति स्मृतम् ।**
**परं तत्सर्वधर्मेभ्यस्तेन यान्ति परां गतिम् ॥**–भार. शां. २१४-७.

" *The great Creator to revere,*
*Must sure become the creature.*" —*Burns.*

" *The first condition of human goodness is something to love; the second, something to reverence.*" —*George Eliot.*

**११३. अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥**

उद्गतः वेगः अस्मात् इति **उद्वेगः**—दुःख; भीति. Trembling; fear, न उद्वेगः **अनुद्वेगः** ( न. स. ), अनुद्वेगं करोति इति **अनुद्वेगकरं** ( उप. त. स. )—न झोंबणारें. Causing no annoyance. **वाक्यम्**—भाषण. Speech, talk. प्रियं च तत् हितंच ( क. धा. स. ) **प्रियहितम्**—गोड व हितकर. Pleasant and beneficial. स्वाध्यायस्य अभ्यसनं ( ष. त. ) **स्वाध्यायाभ्यसनम्**—वेदशास्त्राचा अभ्यास. The study of the Vedas, and scriptures. वाचः इदं, वाक् प्राचुर्येण प्रस्तुता अस्मिन् वा, इति **वाङ्मयं**—वाचेचा, वाचेसंबंधीं, वाणीचा. Relating to speech, or language. वाचः विकारः वाङ्मयम् ।

**अन्वयः**—यत् अनुद्वेगकरं, सत्यं, प्रियहितं च वाक्यं, यत् च स्वाध्यायाभ्यसनं ( तत् ) एव **वाङ्मयं तपः** इति उच्यते ।

**अर्थः**—कोणाच्या मनाला लागणार नाहीं असें सौम्य, सत्य, गोड व कल्याण-कारक भाषण करणें, आणि वेदादि धर्मग्रंथांचें अध्ययन चालू ठेवणें, याला **वाङ्मय तप** ( वाचिक तपाचरण ) असें म्हणतात. १५

The utterance of words causing no anxiety (or hurt to anybody's mind) and which is truthful, pleasant and beneficial, and the constant study of scriptures (Vedas and Upanishadas)—these are said to be the austerity of speech." 15

**सत्यं ब्रूयात्प्रियं ब्रूयान्न ब्रूयात्सत्यमप्रियम् ।**
**प्रियं च नानृतं ब्रूयादेष धर्मः सनातनः ॥** —मनु. ४-१३८.

**अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः** ॥सभा. ६३–१७.

**आपद्युन्मार्गगमने कार्यकालात्ययेषु च ।**
**कल्याणवचनं ब्रूयादपृष्टोऽपि हितो नरः** ॥ –सुभा. र. ३-४८४.

*" Truth makes true love doubly sweet to know "* —*Leigh Hunt.*
*" The little sweet doth kill much bitterness."* —*Heats.*

**१२४. मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।**
**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥**

प्रकर्षेण सीदन्ति इंद्रियाणि मनः च अस्मिन् इति **प्रसादः**, मनसः प्रसाद ( ष. त. स. ) **मनःप्रसादः**—मनाची प्रसन्नता; शांतता, आनंद. Composure of mind; mental calm or peace. सोमः देवता अस्य इति इदं **सौम्यत्वं**—शीतलता, सौम्यपणा; आनंदी वृत्ति. Loveliness, gentleness, mildness. मुनेः भावः **मौनम्**—मुकेपणा; नियमित भाषण. Silence; taciturnity,—laconism. विशेषेण निग्रहः **विनिग्रहः**—संयमन. Control. आत्मनः विनिग्रहः (ष. त. स.) **आत्मविनिग्रहः**—आत्मसंयमन. Self-control, relf restraint. भावस्य सम्यक् शुद्धिः ( ष. त. स. ) **भावसंशुद्धिः**—मनाचें पावित्र्य, शुद्धांतःकरण. Purity of mind, pure-mindedness. मनसः इदं इति **मानसम्**—मनासंबंधीं, मानसिक, मनाचें. Mental; pertaining to the mind.

**अन्वयः**—मनःप्रसादः, सौम्यत्वं, मौनम्, आत्मविनिग्रहः, भावसंशुद्धिः च इति एतत् **मानसं तपः** उच्यते ।

**अर्थः**—मनाची प्रसन्नता, आनंदी स्वभाव, परिमित भाषण, आत्मसंयमन, आणि अंतःकरणाचें पावित्र्य अशा प्रकारच्या आयुष्यक्रमाला **मानसिक तपाचरण** असें म्हणतात. १६.

Mental tranquility, loveliness of mind, silence (laconism), self-control, and pure-mindedness—these qualities make what is called the austerity of mind—the group of these five is said to be *the penance of the mind.* 16

**मनसश्चेन्द्रियाणां चाप्यैकाग्र्यं परमं तपः ।**
**तज्ज्यायः सर्वधर्मेभ्यः स धर्मः पर उच्यते ॥** शांति २५०-४.
**प्रसादमाधुर्यगुणोपपन्नाः । यत्नादनौचित्यपराङ्मुखाणाम् ।**
**अर्थाः कवीनामिव सज्जनानाम् । सर्वस्य सर्वावसरोपयोगाः ।**
-सुभाषितर. २-१६७.

*" O now, for ever*
*Farewell the tranquil of mind ! farewell content !*
*Farewell the plumed troop, and the big wars,*
*That make ambition virtue ! O farewell !"*-*Shakespeare-Othello.*
*" The great mind knows the power of gentleness,*
*Only tries force because persuaion fails."* —*R. Browing*

**१९५. दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥**

दातुं उचितं इति **दातव्यम्**—( विध्य. क. धा. वि. *pot. pass. p.* of **दा**-१ प; ३ उ. देणें, अर्पिणें. 1 P., 3 U. to give; to offer. )-द्यावयाचें. To be given or offered. **दानं**—देणगी, समर्पण, धर्मार्थ देणें. Donation, present, giving away as charity. **दीयते**—( कर्म. व. तृ. ए. *pass. pre.* 3rd sing of **दा**—देणें to give )—दिलें जातें. Is given or granted. न उपकारः **अनुपकारः** ( न. स. ), अनुपकारः क्रियते अनेन सः **अनुपकारिन्**; उपकारः अस्य अस्ति इति **उपकारी**, न उपकारी **अनुपकारी**, ( अनुपकारिन् ), तस्मै **अनुपकारिणे**—उपकाराची परत फेड न करणारास; कृतघ्न व्यक्तीस. To him who does not and cannot return the present or charity; to the ungrateful. **देशे**—योग्य ठिकाणीं. At a proper place. **काले**—योग्य कालीं. At a proper time. **पात्रे**—योग्य मनुष्यास. To a fit or worthy person. **सत**:

भावः **सत्त्वम्**, सत्त्वस्य इदं इति **सात्त्विकम्**—साधुवृत्तीचें, खरें, श्रेष्ठ. Good, real, essential. **स्मृतम्**—कर्म. भू. धा. *p. p.* of **स्मृ**—१ प. ( प्राचीन महाकाव्यांत आत्म. रूपेंहि आढळतात. Also Atm. use in the Epic poetry ).—मानणें, समजणें. To regard, consider.

**अन्वयः**—दातव्यं इति यत् दानं अनुपकारिणे, देशे, काले च पात्रे च दीयते तत् **दानं सात्त्विकं** इति स्मृतम्।

**अर्थः**—दानधर्म करणें हें कर्तव्य समजून जें दान, आपणांवर उपकार न करणारालासुद्धां, देश-काल-परिस्थिति व योग्य मनुष्य पाहून करण्यांत येतें, अशाच दानधर्माला **सात्त्विक दान** म्हणतात. २०

The alms given as an inevitable duty to a worthy and even an ungratefnl person without expectation of its return, at the proper place and time, is called *charity* or the essential gift. 20

**पात्रे दानं स्वल्पमपि काले दत्तं युधिष्ठिर।**
**मनसा हि विशुद्धेन प्रेत्यानंतफलं स्मृतम्** ॥ –वन. २५९–३४.
**अक्रोधेन जयेत्क्रोधमसाधुं साधुना जयेत्।**
**जयेत् कदर्थ्यं दानेन जयेत्सत्येन चानृतम्** ॥ –म. भा उद्योगपर्व.

*" Unto the end shall charity endure,*
*And candour hide those faults it cannot cure. "* —*Churchill.*

*" It is another's fault if he be ungrateful; but it is mine if I do not give. To find one thankful man I will oblige many that are not so. "* —*Seneca.*

*" Charity begins at home, is the voice of the world. "*
—*Sir T. Browne.*

**११६. यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः।**
**दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम्** ॥ २१ ॥

**यत्**–सर्व. जें. *pron.* Which. **तु**—अ. परंतु, पण. *ind.* But. उपकारः उपकार प्रति **प्रत्युपकारः**, प्रत्युपकाराय यथा स्यात् तथा **प्रत्युपकारार्थं** ( अव्य. स. )—परत उपकारानें फेड व्हावी म्हणून. With a hope ofgaining the Charity in return. **उद्दिश्य**—भू. धा. अ. *Ger.* of **उत्+दिश्**—६ उ. हेतु-इच्छा असणें. 6 U. to intend, aim at. **वा पुनः**—किंवा, अथवा. Or. परि-

**क्लिष्टं**—( भू. धा. *p. p.* of परि + क्लिश्—९ प. )—खिन्न मनानें, दुःखानें. With vexed, reluctant or troubled mind. रजसः इदं इति **राजसम्—रजो-गुणी; षड्रिपुसंबंधीं.** Relating to the passions.

**अन्वयः**—पुनः तु, प्रत्युपकारार्थं, फलं उद्दिश्य परिक्लिष्टं वा यद्( दानं ) दीयते तत् **राजसं दानं** इति स्मृतम् ।

**अर्थः**—परंतु, केलेल्या उपकाराची फेड होईल या हेतूनें, किंवा फलाशेनें अथवा मोठ्या दुःखानें जें दान करण्यांत येतें, त्याला **राजस दान** असें म्हणतात २१

But the alms given for the sake of recompense, or with the expectation of its fruit in future, or reluctantly, is considered *the charity of passions.* 21.

**शक्यं ह्येवाहवे योद्धुं न दातुमनसूयितम् ।** -भार. अनु. ८-१०.
**दानं सत्त्वाश्रितं कुर्यान्न पश्चात्तापवान्भवेत् ।**
**बलिनात्मार्पितो बंधे दानशेषस्य शुद्धये ॥** –सुभाषितरत्न.

*" There is no true potency, remember, but that of help; nor true ambition, but ambition to save."* —*Ruskin.*

*" To alter favour ever is to fear."* —*Shakespeare.* —*Macbeth.*

*" It is proper that alms should come out of a little purse, as well as out of a great sack; but surely where there is plenty, charity is a duty, not a courtesy; it is a tribute imposed by Heaven upon us, and he is not a good subject who refuses to pay it."* —*Felthan.*

**१२७. अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।**
**असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतं ॥ २२ ॥**

न देशः **अदेशः** ( न. त. स. ), तस्मिन् **अदेशे**—अस्थानीं. At an unfit place. न कालः अकालः ( न. त. स. ), तस्मिन् **अकाले—**अयोग्य वेळीं. At an improper time. पाति रक्षति आधेयं, पिबति अनेन वा इति **पात्रं-**भांडें; योग्य, लायक मनुष्य. A vessel, a fit or *worthy person.* न पात्रं अपात्रम् ( न. स. ), तस्मिन् **अपात्रे**—दानधर्म घेण्याला अयोग्य अशा व्यक्तीस. To the person who is not fit for receiving alms. न सत्कृतं यथा स्यात् तथा ( अव्य. स. ) **असत्कृतम्**—मान-सत्कार न करितां.

Disrespectfully, unceremoniously. **अवज्ञातं—भू. धा.** *p. p.* of **अव+ज्ञा**—९ प. कमी लेखणें, तिरस्कारानें वागविणें. 9 P. to disregard, treat one with contempt. तमसः इदं इति **तामसम्**—तमोगुणी; फार कमी दर्जाचें. Relating to ignorance, most inferior. **उदाहृतम्**—भू. धा. वि. *p. p.* of **उत्+आ+हृ**—१ प. प्रसिद्ध करणें; सांगणें, कथन करणें. 1 P. to declare; relate, narrate.

**अन्वयः**—यत् दानं अदेशकाले, अपात्रेभ्यः च असत्कृतम् अवज्ञातं ( वा ) दीयते, तत् **तामसं ( दानं )** इति उदाहृतम् ।

**अर्थः**—भलत्याच ठिकाणीं, अयोग्य वेळीं आणि अयोग्य मनुष्यांना—ज्याला खरोखरच जरूरी नाहीं अशा मनुष्यांना,—आदर सत्कार न करितां अपमानपूर्वक जें दान देण्यांत येतें त्याला **तामस दान** असें म्हणतात. २२

The alms which is given at an unfit place and time, and to unworthy persons, unceremoniously and contemptuously, is considered to be dull, or of the most inferior nature. 22

**पापेभ्यो हि धनं दत्तं दातारमपि पीडयेत् ।**
**तस्माद्धर्मार्थमनृतमुक्त्वा नानृतभाग्भवेत् ॥** –कर्णपर्व ६९–६५.

*" Do not count it holy*
*To hurt by being just : it is as lawful*
*For us to count we give what's gained by thefts,*
*And rob in the behalf of charity."*

*—Shakespeare–Troilus & Cressida, V–III.*

**११८. यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।**
**कर्म चैवं तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥**

**स्थितिः**—स्थिर भक्ति–निष्टा. Steadfastness. **सत्**—चांगलें, श्रेष्ठ; खरें. Good; real. **तत्**—( तच्छब्देन लोकशास्त्रप्रसिद्धः परमेश्वरः गृह्यते ।—**शंकरानंदी टीका.** ) तो सर्वश्रेष्ठ परमेश्वर. The supreme God. तदर्थं कृतं **तदर्थीयं** परमेश्वरप्रात्यर्थं कृतं कर्म–**नीलकंठी टीका**; तेषां ( यज्ञ–तपो–दानानां ) अर्थः अस्य अस्ति इति तत् **तदर्थीयम्**–**पं. कृष्णशर्मा.** **अभिधीयते**—कर्म. व. तृ. ए. *pass, pre.* 3rd. sing. of **अभि+धा**—३ उ. नांव देणें; ठरविणें. 3 U. to name designate; call.

**अन्वयः**—यज्ञे, तपसि, दाने च ( या ) स्थितिः, ( सा ) **सत्** इति उच्यते । च **तदर्थीयं** कर्म **सत्** इति एव अभिधीयते ।

**अर्थः**—यज्ञहवन, तपाचरण, आणि दानधर्म यांच्या ठायीं जी स्थिर निष्ठा तिलाच शहाणे लोक **सत्** असें म्हणतात. यज्ञयागाप्रीत्यर्थ–परमेश्वरप्राप्त्यर्थ–जें जें म्हणून कर्म केलें जातें त्यालाहि **सत्** ( सत्कर्म ) असेंच नांव देतात. २७

Steadfastness in sacrifice, austerity and charity is called *Sat* ( good and real ); and every action performed for the sake of sacrifices and other things ( for the Supreme God ) is also termed " Sat " ( Good action ). 27

**दाने तपसि सत्ये च यस्य नोच्चरितं यशः ।**
**विद्यायामर्थलाभे वा मातुरुच्चार एव सः ॥** –उद्यो. १३३-३४.
**उपकारः परो धर्मः परार्थं कर्म नैपुणम् ।**
**पात्रे दानं परः कामः परो मोक्षो वितृष्णता ॥**–सुभा. रत्न. ३-८२.

*" And this our life, exempt from public haunt,*
*Finds tongues in trees, books in running brooks,*
*Sermons in the stones, and good in everything. "* —*Shakespeare*
*" The good needs fear no law;*
*It is his safety, and the bad man's awe. "* —*Massinger*
*" Steadfastness is a noble quality, but, unguided by knowledge or humility, it becomes rashness. "* —*Swartz*

**१२९. अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥**

न श्रद्धा **अश्रद्धा**—( न. स. )—भाव-भक्ति नसणें. Unbelief, diffidence. तया **अश्रद्धया हुतं**—( भू. धा. वि. *p. p.* हु—३ प. )—यज्ञ-हवन केलेलें; उपासिलेलें. Offered as an oblation to fire; oblation or offering in sacrifice. **दत्तं** ( दा-१,२,४ प ३ उ.)—दिलेलें. Given. न सत् इति **असत्**—( न. त. स.)—खोटें; ढोंगी आचरण; वाईट. Unreal; pretentiousness; bad. **उच्यते**—(क. नृ. ए. *pass.* 3rd sing. of **वच्**—२ प.)—म्हटलें जातें, म्हणतात. Is said or called. **प्रेत्य न**—परलोकसुखाय न भवति—**शंकरानंदी**; मृत्वा परलोके नोपयुज्यते—**नीलकंठः**; प्रेत्य धा. अ. *ger.* of **प्र+इ**. २ प.—मेल्यानंतर. After departing from this world, after death. **नो** ( न+उ ) अव्य.

नाहीं. नकारात्मक अव्यय. *ind.* No, not. इह—येथें; या लोकीं. Here; in this world.

**अन्वयः**—पार्थ ! यत् अश्रद्धया हुतं, दत्तं, तपः तप्तं, यत् च कृतं, तत् **असत्** इति उच्यते । तत् प्रेत्य न इह नो च ।

**अर्थः**—श्रद्धाविहीन मनानें जें होमहवन केलें जातें, दान दिलें जातें, तप आचरिलें जातें, किंवा कसलेंहि कर्म केलें जातें त्याला **असत्** म्हणजे खोटें ( ढोंगी-पणाचें ) आचरण असें म्हणतात. त्याचा उपयोग मेल्यावर परलोकीं, अथवा जीवंत असतांना या लोकींहि कांहींच नाहीं. २८

Whatever offering is sacrificed, gift given, austerity suffered, or action performed—if it is done without faith at heart, it is called Asat–that is unreal and pretentious–O Arjuna, the son of Prithâ ! It is useful neither in the next world ( after death ) nor in this ( while living ). 28

**न धर्मः प्रीयते तात दानैर्दत्तैर्महाफलैः ।**
**न्यायलब्धैर्यथा सूक्ष्मैः श्रद्धापूतैः स तुष्यति ॥**

–भार. अश्व. ९०–९९.

*" In Love, if Love be Love, if Love be ours,*
*Faith and unfaith can never be equal powers.*
*Unfaith in aught is want of faith in all."* —*Tennyson.*

*" ( The shackles of an old love straiten'd him ),*
*His honour rooted in dishonour stood,*
*And faith unfaithful kept him falsely true."* —*Tennyson.*

---

## अध्याय अठरावा

सर्व साधारणपणें गीतेंतील कर्मयोगशास्त्रांत **संन्यास** शब्दाचा अर्थ फक्त, **फलाशेनें केलेल्या कर्माचा त्याग,** येवढाच आहे. वेदांतशास्त्रांत **संन्यास** म्हणजे **चतुर्थाश्रमांत प्राप्त होणारा सर्वसंगपरित्याग** होय. परंतु तो अर्थ या ठिकाणीं अभिप्रेत नाहीं. कर्तव्य म्हणून प्राप्त होणारीं सर्व कर्में आमरण

करीत राहून तीं, सर्व विश्वाचा आदिकारण जो **परमेश्वर**, त्याच्या चरणीं अर्पण केल्यानेंच खरा **मोक्ष** कर्मकर्त्यास मिळतो. अशा प्रकारें सर्वश्रेष्ठ जो मोक्ष तो प्राप्त करून देणाऱ्या **संन्यासयोगाचें** विवरण या शेवटच्या कळसरूपी १८ व्या अध्यायांत आल्यानें यास **मोक्षसंन्यासयोग** असें नांव दिलें आहे.

**१३०. काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्व-कर्म-फलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥**

कामयितुं योग्यं **काम्यं**—पुढील फलाच्या आशेनें करावयाचें अथवा केलेलें ( कर्म ). Action full of desire of fruit for the future. निश्चयेन अस्यते इति **न्यासः** ( नि + **अस्** ४ प. सोडणें, टाकणें. 4 P. to give up, resign. ) –निश्चयपूर्वक सोडून देणें, त्याग; अर्पण. Resignation, giving up; offering. सम्यक् न्यासः **संन्यासः**—सोडून देणं; अर्पिणें; ऐहिक वस्तुंचा **संबंध** सोडणें. Leaving; renunciation; abandonment of temporal concerns. **कवयः**—( कवयन्ति ते, क्रान्तदर्शिनः निष्कर्षशितत्त्वज्ञाः च–**बालबोधिनी** )– शहाणे, ज्ञाते, तत्त्वज्ञ पंडित–ऋषी. The wise, philosophers or the sages. **विदुः**—( वर्त. तृ. ब. *pre.* 3rd pl. of **विद्**—२ प. जाणणें; मानणें. 2 P. to know; regard. विद् धातुला पूर्णभूत काळाचे प्रत्यय जोडून वर्तमान काळाचीं रूपें विकल्पेंकरून होतात. The Present-forms of विद् are optionally made up by adding to it the terminations of the Perfect : वेद, विद्व, विद्म; वेत्थ, विदथुः, विद; वेद, विदतुः, विदुः.)—जाणतात. Know, regard. सर्वाणि च तानि कर्माणि **सर्वकर्माणि** ( क. धा. ); सर्वकर्मणां फलं ( ष. त. ), तस्य सर्वकर्मफलस्य त्यागः ( ष. त. ). **सर्वकर्मफलत्यागः**, तम् सर्वकर्मफलत्यागम्. **प्राहुः**—वर्त. तृ. ब. *pre.* 3rd. pl. of प्र + आह् (प्र + ब्रू—२ उ.)—म्हणतात. Say, declare. ब्रू धातुचीं वैकल्पिक रूपें तृ. पु. ब द्वि. पु. ए., द्वि.: Optional forms of ब्रू 3rp and 2nd S. & D. :—आह, आहतुः, आहुः; आत्थ, आहथुः. प. श्लो. ५१. विशेषेण चष्टे इति ( वि + चक्ष्—२ प.) **विचक्षणः**—शहाणा, ज्ञाता, जाणता. The wise.

**अन्वयः**—कवयः काम्यानां कर्मणां न्यासं **सन्यासं** ( इति ) विदुः । विचक्षणाः सर्वकर्मफलत्यागं **त्यागं** इति प्राहुः ।

**अर्थः**—फलाशेनें कर्मे न करणें ( किंवा केलेलीं कर्मे ईश्वरार्पण करणें ) यालाच **संन्यास** असें शहाणे लोक म्हणत आले आहेत; व सर्व प्रकारच्या कर्मफलांची अपेक्षा न करितां कर्तव्य बजावणें याला ज्ञाते **त्याग** असें म्हणतात. २

*By renunciation*, the philosophers understand the resignation of actions full of desires, and by *giving up*, the wise knows the performance of all actions devoid of desire for fruits. 2.

**इह चामुत्रं वा काम्यं प्रवृत्तं कर्म कीर्त्यते ।**
**निष्कामं ज्ञानपूर्वं तु निवृत्तमुपदिश्यते ॥** -मनु. १२-८९.

*" It is easier far to loose than to resign. "* —*Tyttelton.*

*" He that, to his prejudice, will do*
*A noble action, and a generous too,*
*Deserves to wear a more resplendent crown.*
*Than he that hath a thousand battles won. "* —*Pomfret.*

*" Unselfish and noble acts are the most radiant epochs in the biography of Souls. When wrought in earliest youth, they lie in the memory of age like the coral islands, green and sunny, amidst the melancholy waste of ocean. "* —*Thomas.*

[ कर्तव्य म्हणून प्राप्त झालेलें कर्म कोणालाही टाळतां किंवा चुकवितां येत नाहीं. म्हणून फलाची आशा न करितां अव्याहत कर्तव्य बजावणें हाच **त्याग** व फलाशेचीं सर्व कर्में वर्ज्य करणें हाच **संन्यास** होय. आणि तीच गोष्ट वर अध्याय १८-२मध्यें सांगितली आहे.

Nobody can avoid or abandon the action befallen to him as his duty. So, it is the Giving up ( त्यागः ) to perform duties unobstructed, without desire for their fruit; and it is the *Renunciation* ( संन्यासः ) to avoid actions full of desire, which is defined in the abovementiond verse ( 18. 2 ).

**१३१. नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥**

नियमेन यतं इति **नियतं**—भू. धा. *p. p.* of नि + यम्—१ प. ताब्यांत ठेवणें, ठरविणें, नियमबद्ध करणें. 1 P. To restrain, fix, regulate. **न उपपद्यते**—( व. तृ. ए. *pre.* 3rd sing of उप + पद् ४ आ. योग्य-लायक असणें; घडणें-होणें, पोहोंचणें. 4 A. to be fit for, suit; happen; reach. )—योग्य नाहीं. It is not proper or does not suit. **मोहः**—अज्ञान. Ignorance. परिः त्यागः **परित्यागः**—टाळणें, चुकविणें. Neglect, relinquishment, omission.

तमः अस्य अस्ति इति तत् **तामसम्**—वाईट, नीच, दुष्ट. Ignorant, malignant or villain. **परिकीर्तितः**—भू. धा. *p. p.* of **परि+कृत्**—१० उ. सांगणें, प्रसिद्ध करणें, प्रशंसिणें. 10 U. to narrate, proclaim, praise.

**अन्वयः**—तु नियतस्य कर्मणः संन्यासः न उपपद्यते । मोहात् तस्य परित्यागः तामसः ( इति ) परिकीर्तितः ।

**अर्थः**—नियत म्हणजे स्वधर्मानुसार प्राप्त झालेलें जें कार्य त्याचा संन्यास करणें योग्य नाहीं व शक्यहि नाहीं; परंतु, जर कोणी अज्ञानामुळें तसा त्याग करूं म्हणेल तर तो तमोगुण स्वरूपाचा त्याग म्हणतां येईल—खरा त्याग नव्हे.

Surely the renunciation of the prescribed action is not proper, nor possible. The relinquishment thereof, through delusion, is said to be of ignorance—it is not the real relinquishment or renunciatinn. 7

**धर्मं हि यो वर्धयते स पण्डितो ।**
**य एव धर्माच्च्यवते स मुह्यति ॥** —शांति. ३२१-७८.
**यदि संन्यासतः सिद्धिं राजा कश्चिदवाप्नुयात् ।**
**पर्वताश्च द्रुमाश्चैव क्षिप्रं सिद्धिमवाप्नुयुः ॥** —शांति. १०-२४.

"*No man can be wiser than destiny.*" —*Tennyson.*

"*A man who knows the world, will not only make the most of everything he does know, but of many things he does not know; and will gain more credit by his adroit mode of hiding his ignorance, than the pedant by his awkward attempt to exhibit his erudition.*" —*Colton.*

**१३२. अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥ १४ ॥**

अधिष्ठीयते जीवात्मना, अधितिष्ठन्ति अस्मिन् इति वा **अधिष्ठानं**—कर्माधारं शरीरम्-बालबोधिनी, कर्तृकरणक्रियाश्रयं शरीरम्-ब्रह्मानंदगिरिः, सुखदुःखभोगायतनं करणानामाश्रयो वा शरीरम्-**शंकरानन्दी** व्याख्या. **अधिष्ठानम**—आश्रयाची जागा; शरीर. Abode, residence; the body. करोति इति **कर्ता**—करणारा. The doer. क्रियते अनेन इति **करणम्**—साधन; हत्यार. An organ, or an instrument of action. **करणं**—इंद्रियरूप साधन. हीं १२ आहेत. An instrumental organ. They are twelve:—

पंच ज्ञानेंद्रियाणि—श्रोत्रं त्वक्चक्षुषी जिव्हा नासिका चैव पंचमी ॥
पंच कर्मेंद्रियाणि—पायूपस्थं हस्तपादं वाक्चैव दशमी स्मृता ॥१॥११ मन, १२ बुद्धि.

पृथक् विधाः यस्य तत् **पृथग्विधम्** ( ब. स. )-निरनिराळ्या प्रकारचें. Of various kinds. **चेष्टाः**—व्यापार, क्रिया. Actions, movements. पृथक् भूताः चेष्टाः इति **पृथक्चेष्टाः**—निरनिराळे व्यापार, क्रिया. Different kinds of actions-activities. देवात् आगतं **दैवम्**—देवापासून झालेलें-आलेलें; नशीब; अधिष्ठात्री देवता. Caused by or coming from Gods; the fate; the presiding deity.

**अन्वयः**—अधिष्ठानं, तथा कर्ता च, पृथग्विधं करणं च विविधाः पृथक् चेष्टाः च, अत्र दैवं एव पंचमम् ( अस्ति ) ।

**अर्थः—सर्व प्रकारचीं कर्में घडून येण्यास**—शरीर किंवा स्थळ, कार्य करणारा कर्ता, इंद्रियरूप निरनिराळीं साधनें, शरीराचे व मनाचे निरनिराळे व्यापार आणि पांचवें देव —इतक्या गोष्टींची जरूरी असते. १४

The body–the residential seat of action–,the actor, various organs, different kinds of functions ( physical and mental ), also the fate–the presiding deity being the fibth. –These five are necessary things to get actions performed. 14

**शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ।** —कुमा. ५-३३.
**सुमंत्रिते सुविक्रान्ते सुकृते सुविचारिते ।**
**सिध्यन्त्यर्था महाबाहो दैवं चात्र प्रदक्षिणम् ॥** -वन. ३६-७.
**यथा बीजं विना क्षेत्रमुप्तं भवति निष्फलम् ।**
**तथा पुरुषकारेण विना दैवं न सिध्यति** ॥-भार. अनु. ६–७.

*" There are some moments in our fate*
*That stamp the colour of our days,*
*As, till then, life had not been felt "* —*The Improvisatrice.*

[ पुढील तीन श्लोकांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांचीं कर्तव्यें सांगितलीं आहेत. **In the following three verses duties of Brahmins, Kshatriyas, Vaishyas and Shudras are defined.** चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः । तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम्—भ. गी. ४–१३ ]

